संगीत

# प्रेमशोधन नाटक.

रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्. एल्. बी.
संगीत—वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष व मतिविकार
या नाटकांचे कर्ते यांनीं लिहिलें व प्रसिद्ध केलें.

जून सन १९११




किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.

प्रस्तुत नाटक गद्यरूपानें १९०८ चे मे महिन्यांत लिहिलें; परंतु त्यांतील जुळ्यांसंबंधाचा भाग प्रयोगास गैरसोईचा असल्यामुळें तें कित्येक दिवस तसेंच पडून राहिलें. १९१० सालीं किर्लोस्कर मंडळीच्या सूचनेवरून त्यास संगीताचें रूप देण्यांत आलें; व त्यानंतर लवकरच त्याचे प्रयोगही सुरू झाले. त्यांवरून तें पुणें, मुंबई, मिरज इत्यादि ठिकाणीं बरेंच लोकप्रिय झाल्याचें दिसून आल्यामुळें आज तें प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

प्रस्तुत नाटकाच्या संविधानकासंबंधानें रा. रा. गोपाळ वामन बापट, रा. रा. गणेश कृष्ण आगाशे व रा. रा. पुरुषोत्तम रामचंद्र लेले यांनीं, आणि पद्यांसंबंधानें रा. रा. विठ्ठल सीताराम गुर्जर यांनीं ज्या सूचना केल्या व रा. रा. विष्णु वामन मोडक यांनीं नाटक छापतांना मला परोपरीची जी मदत केली त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्याचप्रमाणें रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर व रा. रा. धुंडिराज रंगनाथ शेंबेकर यांनीं नाटकाच्या सर्व अंग संबंधानें ज्या महत्वाच्या सुधारणा सुचविल्या त्यांबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहें. शेवटीं नाटकाचा विषय अपरिचित असतांही त्याचें सत्हृदयत्वानें अवलोकन करून उत्तेजन दिल्याबद्दल रसिकांचे उपकार मानून ही अल्प प्रस्तावना संपवितों.

मुंबई ता. ६-६-१९११. } श्रीपाद कृष्ण कोल्हटकर.

# संगीत

# प्रेमशोधन नाटक.

## नमन.

( चाल–मनमोहन मुरलीवाला )

अभिवादन करित निसर्गा । सुंदरयोगा ॥ ध्रु० ॥
प्रभा रवीची करि अर्धांगी । ज्योत्स्ना ठेवी
विधुच्या संगीं । लतिकेसी तरुच्या उत्संगीं ।
जो वसुंधरेशीं योजी अंबरभागा ॥ १ ॥
परमात्म्यासी जैसी माया । अनुकूला जी
निज पतिराया । अनुसरते जी कृतिसि तदीया ।
त्या कलागेहिनीशिं जो धरी अनुरागा ॥ २ ॥

## मंगलाचरण.

( चाल—तेंडेरे कारन मेंडेरे० )

शिव सदा करो ॥ तुमचें ॥ तो प्रभु मंगलनि-
धान। स्वानंदिं सदैव लीन। असुख संहरो ॥ ध्रु० ॥
पसरुनिया ज्ञानाकिरण। करि जो अज्ञानहरण।
चिद्घन तो ईश तूर्ण। मोह आवरो ॥ १ ॥
कलुषितही मनुजचरित। कालवसनपूत करित।
पुण्यात्मा विभु तो द्रुत। सुमति मनिं भरो ॥ २ ॥

---

# अंक १ ला.

---

## प्रवेश १ ला.

( नंदन व अमात्य )

**अमा०**—महाराज, आपण मघांपासून एकटेच सचिंत बसलां आहांत; कोणाशींही बोलत नाहीं; मधून मधून दीर्घ श्वास चालले

आहेत; यावरून आपणांस कांहीं तरी दुःखाची वार्ता कळली असावीशी दिसते. दासाला सांगण्यास हरकत नसेल तर ती कळण्याची इच्छा आहे.

नंद०— ( एक पत्र अमात्याच्या हातांत देतो. )

अमा०— ( वाचून ) मोठा चमत्कार आहे ! पण हें कंदन-महाराजांचेंच कशावरून ?

नंद०— अमात्य, हें पत्र कंदनाच्या हातचें असल्याबद्दल शंका नको. मी आणि तो लहानपणापासून इतकीं वर्षें एकत्र वाढलों, त्यामुळें त्याच्या स्वभावाप्रमाणें त्याच्या अक्षराशीं माझा पूर्ण परिचय आहे.

अमा०—आपण ह्मणतां त्याप्रमाणें जरी हें त्यांचें अक्षर असलें तरी या पत्रांत त्यांनीं आत्मघाताबद्दल जो मजकूर लिहिला आहे तो खरा कशावरून ?

नंद०—खोटा तरी मानण्याचें कारण काय ? कंद-
तून नाहींसा झाला असें लोकांना कळून त्यास क
उलट त्याच्या पक्षाचे जे लोक असतील ते य
मात्र होतील. ही बातमी खोटी ठरण्याचा दुर्दैवा
नाहीं. दहा वर्षे प्रेमशून्य आयुष्य कंठिल्यानंतर कोणा

कंटाळा येणार नाहीं ! त्याचें मोहिनीवर अतोनात प्रेम ! तिच्याशीं आपला विवाह व्हावा ही त्याची लहानपणापासून इच्छा ! परंतु वडील मुलाचा वडील मुलीशीं व धाकट्याचा इंदिरेशीं विवाह करण्याचा आमच्या वडिलांचा आणि मंदारमहाराजांचा संकल्प होता; आणि कंदन व मी जरी जुळे होतों तरी तो माझ्याहून एक क्षण आधीं जगांत आल्यामुळें धाकटा ठरून मी वडील व मोहिनीस योग्य वर ठरलों.

अमा०—कंदनमहाराज व मोहिनीराणीसाहेब यांचें बाळपणापासूनचें प्रेम माहित असतां उभयतां राजेसाहेबांनीं हा विचार कसा अमलांत आणिला याचा चमत्कार वाटतो.

नंद०— लग्नानंतर कंदनावरील मोहिनीचें प्रेम अभ्यासानें बदलून त्याच्या सदृशाकृति जुळ्या भावावर बसण्याला कांहीं हरकत नाहीं असें त्यांना साहजिकच वाटलें असावें. या विवाहाचे पुढें काय काय परिणाम होणार आहेत याची त्या बिचाऱ्यांना कल्पनाहि नव्हती. लग्नाच्याच दिवशीं कंदन एकाएकीं नाहींसा झाला; तेव्हां मात्र बाबांना आपल्या कृत्याचा पूर्ण पश्चात्ताप झाला. एक वर्ष होऊनही त्याचा पत्ता लागेना, तेव्हां त्यांनीं अपत्यशोकानें जें एकदां अंथरूण धरिलें तें कायमचेंच. त्यांच्या अंतकाळच्या इच्छेप्रमाणें मी राज्याचा अर्धा भाग त्याच्या नांवानें

निराळा ठेवून त्याचा कारभार केवळ त्याचा प्रतिनिधि या नात्यानें पहात आहे, हें आपणांस माहित आहेच.

अमा०— शाबास आपल्या निस्पृहतेची ! इतकें पितृप्रेम आणि बंधुप्रेम कंदनमहाराजांच्या अंगीं नव्हतें हें दुर्दैव !

नंद०— यांत प्रेमापेक्षां न्यायाचा भाग अधिक आहे. या संबंधानें कंदनाचें जें ह्मणणें असे तें अगदीं यथार्थ वाटतें. एक क्षण अगोदर जन्मल्यामुळें कनक आणि कांता दोन्ही हातून जावीं हा कुठला न्याय? एखाद्या कार्यास एक क्षण उशीर झाला तर कधीं कधीं मोठे अनर्थ घडून येतात हें ठीकच आहे. परंतु एक क्षण अगोदर आल्यामुळें येवढें मोठें प्रायश्चित्त कां मिळावें !

( चाल—कलना परत रहे० )

क्षण एक जो पूर्वीं । जन्माप्रती येइ । ठरुनी
अनुज राजपद्योग्य ना राहि ॥ ध्रु० ॥ अधिका-
नुभव ज्यास । जगिं दीर्घतर वास । योग्या न
भू त्यास । हा न्याय का होइ ॥ १ ॥

माझ्या लग्नामुळें कंदन मोहिनीस कायमचा अंतरला. ती चूक दुरुस्त करण्यासारखी नव्हती. राज्याचा अर्धा हिस्सा त्यास देऊन

वृक्षाला सुंदर पालवी फुटेल अशी मला फार आशा होती; पण व्यर्थ!

अमा०— ईश्वर करो व आपल्या शाखेचा विस्तार होऊन आपला वंश चिरंजीव होवो!

नंद०— आपली इच्छा परम मंगल आहे; पण ती पूर्ण होण्याच्या मार्गांत अनुल्लंघनीय प्रत्यवाय आहेत.

अमा०— मला आपला भावार्थ कळला नाहीं.

नंद०— कधीं तरी मागें पुढें आपणांस माझ्या वैवाहिक चरित्राचें रहस्य सांगावें लागणार. तें आजच आपणांस कळल्यास गादीच्या वारसाची आपणांस योग्य तजवीज करण्यास ठीक पडेल.

अमा०— महाराज, असें अभद्र भाषण आजच कां बरें?

नंद०— मी जें कांहीं अभद्र सांगणार आहें त्यांत नवीन असें कांहींच नाहीं. ज्या विवाहास कंदनाचा मृत्यु हें एक फळ आलें त्याचेंच दुसरें फळ माझ्या अपुत्रत्वाच्या रूपानें प्रत्ययास आलें.

अमा०— अजून आपणांस निराश होण्याचें कारण नाहीं.

नंद०— मी आणि मोहिनी पतिपत्नी केवळ नांवाला आहोंत. बाबांची आज्ञा मोडूं नये म्हणून मी विवाहविधि होऊं दिला खरा. परंतु आमचे उभयतांचे स्वभाव अत्यंत भिन्न असल्यामुळें आमच्या

मनांत परस्परांविषयीं एकदम अरुचि उत्पन्न झाली व ती आज दहा वर्षें सतत कायम आहे. लौकिकदृष्ट्या जरी आह्मी पतिपत्नी आहोंत तरी त्या सर्वसाक्षी परमेश्वराच्या दृष्टीनें आह्मी बहीणभावंडेंच आहोंत.

अमा०— आपणां उभयतांत फारसें प्रेम नसावें असा मला संशय होताच. पण तें अप्रेम या थराला जाईल अशी मात्र माझी मुळींच कल्पना नव्हती. अशा प्रेमरहित स्थितींत सुद्धां आपण आपली आनंदी वृत्ति कायम ठेविली हें केवढें आश्चर्य ! या स्थितींतून सुटण्याला आपणाला द्वितीय संबंध मोकळा होता. पण आपण त्याचाही अंगीकार केला नाहीं.

नंद०— मी जर द्वितीय संबंध केला असता तर बिचाऱ्या मोहिनीच्या जन्माचें मातेरें करून तिच्या दुःखावर डाग दिल्यासारखें नसतें का झालें ? हल्लीं मला समदुःखी पाहून तिला आपल्या दुःखाचा भार सह्य तरी होत असेल.

( चाल— अठवुं किती उपकारा )

असुखगृहा गृहिणीचें । शिखर रचुं कवण्या हातें
॥ ध्रु० ॥ प्रथम हिरावुनि सौख्य तियेचें सेवूं का
सौख्यातें ॥ १ ॥ अंतर्यामीं व्रणित तियेच्या ओतूं
का लवणातें ॥ २ ॥

अमा०- आपणांला प्रत्येकाच्या सुखाबद्दल काळजी ! काळजी नाहीं ती स्वतःच्या सुखाबद्दल मात्र नाहीं.

नंद०— बिचाऱ्या मोहिनीला हें दुःखकारक वृत्त कळविलें पाहिजे. आणि येथून निघून अनाथप्राय झालेल्या इंदिरेची व तिच्या पित्याची त्यांच्या वनांतील आश्रमस्थानांत गांठ घेऊन कंदनाचें अर्धे राज्य तिला अर्पण केलें पाहिजे. मंदारमहाराजांचा स्वभाव जरी मानी आहे, तरी कंदनाच्या वाग्दत्त वधूकरितां माझ्या देण्याचा ते अव्हेर करणार नाहींत असें वाटतें.

अमा०- आपण एकटे जाण्याचा जो बेत केला आहे तो माझ्या अल्प बुद्धीला जरा चमत्कारिक वाटतो.

नंद०— राजानें प्रवास करावयाचा तो परिवारासह केला पाहिजे असें आपणांला जसें वाटतें तसेंच इतरांनाही वाटत असल्यामुळें मी एकटा गेल्यानेंच माझा प्रवास सुरक्षितपणें पार पडेल अशी माझी खात्री आहे. शिवाय नेहमीं कैद्याप्रमाणें रहाण्याला मी अगदीं कंटाळून गेलों आहें. या अफाट जगावर कांहीं दिवस स्वतंत्रपणें फिरण्याला सांपडल्यास माझ्या जिवाला जरा बरें वाटेल. माझ्या निष्प्रेम आत्म्यास एकट्यानेंच प्रवास करणें योग्य !

अमा०— आपण न जातां एखाद्या सरदारावर ही कामगिरी सोंपविली तर नाहीं का चालणार ?

नंद०— मंदारमहाराजांचा स्वभाव मोठा मानी असल्यामुळें जी गोष्ट ते माझ्याकरितां कबूल करितील ती इतरांकरितां करितीलच असें नाहीं. अमात्य, आतां माझ्या जाण्याला मोडा घालूं नका. आपलें मजवर किती प्रेम आहे हें मला पूर्णपणें माहित आहे. ज्या प्रेमामुळें आपणांला माझ्या प्रवासाबद्दल काळजी वाटत आहे त्याच प्रेमावर भिस्त ठेवून मी निर्धास्तपणें येथून निघणार. ईश्वरकृपेनें वाटेंत मजवर कोणतेंही संकट येणार नाहीं. उदईक कंदनाच्या मृत्यूची बातमी शहरांत जाहीर करून तन्निमित्त मी राजवाड्यांत एकांतवास पत्करिला आहे असें प्रजेस कळवा; ह्मणजे मी येथून निघून गेलों आहें याचा कोणासही संशय येणार नाहीं.

( जातो. )

अमा०— देवा, आमच्या महाराजांस चिरायु कर ! हें उदार हृदय आणि हें प्रजाप्रेम आह्मांस बरींच वर्षें लाभो !

( चाल०—तुजविण कोण दुजा० )

हे हरि भूप करीं सुखशाली । निर्वेदें मति कष्टी
झाली ॥ ध्रु० ॥ आयुष्पथ करिं सुगम तयाचा ।

पसरि तयावरि मृदु कुसुमें फुललीं ॥ १ ॥
प्रजाजनां चिर लाभो त्याचें न्यायदयायुत
शासन वनमाळी ॥ २ ॥

आतां प्रथम मला महाराजांच्या प्रवासांतील कुशलवर्तमान वरचेवर कळण्याला एखाद्या कुशलवार्ताहराची योजना केली पाहिजे.

( जातो ).

---

## प्रवेश २ रा.

( मोहिनी व पुष्करिणी. )

**मोहि०**— ( एकीकडे ) नुकाच त्यांच्याकडून निरोप आला कीं माझ्याशीं कांहीं महत्वाचें बोलायचें आहे. काय कर्मकथा सांगणार आहेत कुणास ठाऊक ! त्यांची भेट जर याप्रमाणें वरचेवर झाली नसती तर मी कंदनमहाराजांचा वियोगही आनंदानें सोसला

असता. पण त्या भेटीनें ह्या वियोगाचें दुःख दुणावतें मात्र. त्यांच्या वडिलांनीं त्यांचें माझ्याशीं लग्न लाविलें यांत त्यांचा कदाचित् दोष नसेल; पण ते बाह्यात्कारीं कां होईना माझे पति ह्मणून मिरवूं लागले ह्मणजे माझ्या तळव्यांची आग कशी मस्तकाला जाते! या यमयातना आणखी किती दिवस सोसावयाच्या आहेत कोण जाणे!

पुष्क०—राणीसाहेब, असा नेहमीं दुःखाचाच विचार करीत गेलें तर माणसाला सुख कसें लागावें? प्रत्येक माणसाच्या वांट्याला जवळ जवळ सारखेंच सुखदुःख येत असतें. पण एकजण त्याच भांडवलावर अत्यंत कष्टी होतो तर दुसरा स्वतःला अत्यंत सुखी समजतो. सुखदुःख हें केवळ आपल्या मानण्यावर असतें.

मोहि०— पुष्करिणि, तूं ह्मणतेस तें सामान्य माणसासंबंधानें खरें आहे; पण माझ्यासारख्या असामान्य दुर्दैवी स्त्रियेस तोच नियम कसा लागूं पडणार?

( चाल—आये हो संयाना० )

दुःखा मी जन्मलें॥ न मिळे सुख कणही। स्वप्नीं
हृदयीं। सुखसिंधु कशी मानुं बळें॥ ध्रु०॥

आशांकुर नुरला हृद्यामधिं । सुखवन सुंदर मी
कशि कल्पुं बरें । अंत न होई कां नकळे ॥ १ ॥

**पुष्क०**— आपणांला तसें पाहूं गेलें तर काय कमी आहे? भूक लागली ह्मणजे पंचपक्कान्नांचें ताट, झोंप येऊं लागली कीं गुडघाभर पराच्या गादीवर केलेली सुंदर पुष्पशय्या—

**मोहि०**— भूक लागली किंवा झोंप येऊं लागली ह्मणजे तूं ह्मणतेस तें ठीक आहे. परंतु जिची अन्नावर इच्छा नाहीं किंवा चिंतेमुळें पापणीला पापणी लागत नाहीं तिची वाट काय?

**पुष्क०**— त्याचप्रमाणें कोणत्याही गोष्टीची इच्छा झाली कीं ती ओळखून पूर्ण करण्याला शेंकडों दासदासी तयारच!

( चाल —ओ डगरिया० )

कल्पतरुच्या छायेखालीं बैसतां। ओष्ठ वचन वदति
न वदति तंवचि निमिषिं घडत अवघीही सिद्धता
॥ ध्रु०॥ हेतु मनीं धरिला कसलाही। तत्पर सेवक-
सेना राही । सकल भोग जवळिं असुनि निशि-
दिनिं करित हृदय तळमळ ही कां वृथा ॥ १ ॥

मोहि०— या सगळ्या गोष्टी बाहेरच्या सुखाला पुरेशा होतील. पण त्यांनीं अंतर्यामींची तळमळ कशी राहणार ?

पुष्क०— हें बरीक खरें, राणीसाहेब ! प्रेमामुळें आह्मांसारख्या गरीबांना जें सुख मिळतें तें त्याच्या अभावीं आपल्यासारख्यांना-सुद्धां दुर्मिळच. पण मी ह्मणतें कीं जेव्हां आपणास चालू घडी-पासून सुख मिळण्याची आशा नसते तेव्हां मागें गेलेलें किंवा पुढें येणारें सुख कल्पनेनें उभें करून नाहीं का मनाची करमणूक करून घेतां येणार ?

मोहि०— यापुढें सुख होईल ही कल्पनाही नको ! आणि मागील सुखाच्या चिंतनानें हल्लींच्या यातना तीव्र मात्र होत जातात.

( चाल—चतुर ब्रिज नारीरे० )

सुख न जगतीं वाटे । सकल उगम जरि शोषुनि
अवचित जाती कशि न सुखनदी आटे ॥ ध्रु० ॥
सुकृतिसुलभ मनुजजन्म मंगल जनक देइ मातें ।
तोचि जन्म परि जाळी हातें । करि कृतांतसम
हृदय अदय मोठें ॥ १ ॥ स्त्रीजीवितसुखसूत्रें
असती सुत-पति-जनकाहातीं । जनक त्यापरी
पतिही यापरि पुत्रकथा मग दूर ऊर फाटे ॥ २ ॥

**पुष्क०**— या लोकीं नाहीं तर परलोकीं तरी सुख मिळण्याची आशा प्रत्येक दुर्दैवी माणसाला असतेच.

**मोहि०**— परलोकावर किंवा ईश्वरावर सुद्धां माझ्यासारखीचा विश्वास रहावा कुठून ? या साऱ्या कल्पना सुखी माणसाला सुचतात. त्याच्या दृष्टीनें परलोक ह्मणजे या जगांतील सुखाची पुढची पायरी असल्यामुळें त्याच्या कल्पनेनें त्यास आनंद वाटतो; पण दुःखी माणसाला तोच परलोक ह्मणजे दुःखाच्या प्रवासांतील एक मोठा पल्ला भासून त्याच्या कल्पनेपासून त्यास सुख होत नाहीं. आणि ह्मणून त्याजवर त्याचा विश्वासही नसतो.

**पुष्क०**— पुष्कळदां आपणास सुख मिळण्याजोगें नसतांना दुसऱ्याच्या सुखापासून आनंद मानून घेतां येतो कीं नाहीं ?

**मोहि०**—तें सारें स्वभावावर आहे. दुसऱ्याच्या सुखावर मिटक्या मारणारीं माणसें आहेत. नाहीं असें नाहीं. पण मी कांहीं त्यांपैकीं नाहीं.

**पुष्क०**— तर मग माझें एखाद्या योग्य पुरुषाशीं लग्न होऊन मला जर सुखांत पडण्याची पाळी आली तर त्याला आपण संमति देणार नाहीं का, राणीसाहेब ?

**मोहि०**— पुष्करिणि, तूं तरी बरीच आहेस कीं ! मला वाटलें

कीं तूं आतांपर्यंत तत्त्वज्ञानाच्या नुसत्या ठराविक गोष्टी सांगत आहेस ! पण बोलतां बोलतां स्वतःवरच ओघ आणिलास ! असो; माझ्या दुःखाची छाया माझ्या आश्रितांवर पसरावी अशी कांहीं माझी इच्छा नाहीं. सांग पाहूं तुझ्या जिवलगाचें नांव ? हं, अशी लाजूं नकोस.

पुष्क०— राणीसाहेब, ते स्वतःच–

मोहि०— हं, बोल तरी पुरती.

पुष्क०— ते लवकरच आपल्या पायांचें दर्शन घेणार आहेत.

मोहि०— घेणार असतील ! पण तुला कांहीं माझ्या पायांकडे दृष्टि लावायला नको ! वर पहा अशी ! सांग पाहूं त्यांचें नांव ?

पुष्क०— ( लाजून ) त्यांचें नांव तडा–

मोहि०— अस्सें ! तुझें नांव पुष्करिणी आणि त्यांचें नांव तडाग ! नांवांप्रमाणेंच स्वभावांची जोड असेल तर तुझ्यासारखी सुखी तूंच ! नाहीं तर आमचें ! ( नंदन प्रवेश करितो ) दुर्दैवाची आठवण होण्याचा उशीर, तें पुढें उभें हीं राहिलें ! पुष्करिणि, तूं पलीकडल्या खोलींत जा पाहूं. ( पुष्करिणी जाते ) ( स्वतःशीं )

यांच्याशीं बोलतांना माझें भानच ठिकाणीं रहात नाहीं. यांना उद्देशून माझ्या तोंडांतून चुकून भलताच शब्द न निघो ह्मणजे झालें!

( उभी रहाते )

नंद०— मोहिनि, तुला एक दुःखाची बातमी सांगण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे!

मोहि०— दुःखाची बातमी असेल तर ती सांगण्याला आपण मुळींच कचरूं नये. दुःख हें माझ्या मनाचें खाद्यच होऊन बसलें आहे. तें नसलें तर माझा जीव निघून जाईल. आनंदाची बातमी असती तर गोष्ट वेगळी होती. तिच्या धक्क्यानें माझ्या प्राणावर बेतली असती. पण देवाला काळजी! तो तसली बातमी कधीं माझ्या कानांवर येऊं देत नाहीं.

( चाल–निष्पापा भू होई० )

ईशाची बाल्यापासुनि पूर्ण कृपा मजवरी ॥ ध्रु० ॥
आजवरी क्लेशार्णविं ठेवी । आजाचि सौख्या
धाडी केवीं । तल्लाभें भ्रमिं मति न पडावी ।
ह्मणुनि करुणमन सुख न वितरि ॥ १ ॥

नंद०— मोहिनि,

( चाल—बघिन स्वप्निं जरि तिला )

दैविं दूषणार्हता । देव दूषिसी वृथा ॥ कर्मफल
सुखव्यथा । प्रभुसि कर्मसाक्षिता ॥ ध्रु० ॥ पूर्व-
जन्मिं छाळिली अति। धरणी कटु करुनी कृति ।
फलित ती अतां । बोल लाविं संचिता ॥ १ ॥

अशा प्रसंगीं संकटें धीरानें सोसणें हेंच मनुष्याचें कर्तव्य आहे.

मोहि०— आजपर्यंत कोणतीं संकटें मीं मुकाट्यानें सहन केलीं नाहींत ? वडिलांनीं निष्ठुरपणानें माझ्या सगळ्या इच्छांची हत्या केली ती मीं आनंदानें डोळे भरून पाहिली कीं नाहीं ? आपणांला व मला उभयतांच्या इच्छेविरुद्ध या संसाराच्या गाड्याला जुंपलें तेव्हां मीं आपली मान हूं कीं चूं न करितां संतोषानें पुढें केली कीं नाहीं ? आमचें असमाधान त्यांनीं वरातींत शहरभर मिरविलें तेव्हां मीं त्यांचा हात धरिला कीं काय ? गेलीं दहा वर्षें हा नष्ट देह पंचपक्वानांनीं पोसून अलंकारांनीं नटविला कीं नाहीं ? आपणांवर प्रेम नसतांना जगाला तें भासविण्याकरितां तोंडावर खोटें हंसूं धारण केलेंच कीं नाहीं ? महाराज. स्पष्टोक्तीबद्दल क्षमा असावी. परंतु जगाच्या रंगभूमीवर आपली धर्मपत्नी ह्मणून चतावणी करून पडद्याच्या आंत सुद्धां माझ्या मनांतले खरे वि-

चार जसेच्या तसे मीं जर बोलून दाखविले नाहींत तर तो मजवर गहजबच होईल !

( चाल–कितितरि सदासदा घेसि० )

तळमळ करी सदा हा जीव । प्रभुरे इच्यांतुनी
सोडीव ॥ ध्रु० ॥ बाह्यांतरीं मज सौख्य न कांहीं ।
ये न कशी तुज कींव ॥ १ ॥ ढोंग पुरे सहवास
नको हा । चरित्र हें संपीव ॥ २ ॥

नंद०— मोहिनि, असा मनाला वृथा क्षोभ करून घेऊं नकोस. मी जी बातमी सांगणार आहें ती ऐकण्याला तूं शांतवृत्तिच धारण केली पाहिजे.

मोहि०— मी आतां सांगितल्या त्यांपेक्षां भयंकर अशी कोणती गोष्ट आपण मला सांगणार आहांत ? बोला लवकर, मी आपलें मन अगदीं घट्ट केलें आहे. बाबांचें राज्य गेलें होतें तें त्यांना परत मिळालें कीं काय ?

नंद०— आपल्या वडिलांसंबंधानें असें निरर्थक कठोर भाषण करूं नकोस. तुझ्या वडिलांना राज्य परत मिळालें तर ती बातमी मी दुःखाची ह्मणून सांगण्याला आलों नसतों.

मोहि०—तर मग माझें हें कष्टमय जीवित कायमचें करण्याला एखादी संजीवनी तर नाहींना सांपडली ?

( चाल—र कमर पतळी )

ही कवण वदतां । अमंगळशी वार्ता ॥ हे देवा
अनंता । किती बघासि अंता ॥ ध्रु० ॥ मृत्यु सुखा
हरि । असुखहि संहरि । उभयनाश हो हो मी
शांता ॥ १ ॥

नंद०— तूं आपल्या कल्पनेला मोकळी सोडून दुःखपर्वताच्या अत्युच्चशिखरीं बशीव ! ह्मणजे तुला तुझ्या दुर्दैवाची सीमा कळून येईल.

मोहि०— मीं सांगितलीं त्यांपेक्षां एकच संकट काय तें सांगावयाचें उरलें आहे. पण तें उच्चारण्याला ओंठ धजतच नाहींत; आणि येवढें मोठें संकट माझें क्रूर दैवही माझ्यावर आणील असें मला वाटत नाहीं.

नंद०— तेंच संकट आज दुर्दैवानें तुजवर आणिलें आहे; व तुजप्रमाणें मंदार व इंदिरा यांसही हें दुःखद वर्तमान कळविण्याकरितां मी उदईक येथून निघणार आहें.

मोहि०— अशी भयंकर बातमी माझ्या कानावर पडून मी गतप्राण झालें कीं आपल्याला आयतेंच इंदिरेशीं लग्न करण्याला अवसर मिळावा असा दुष्ट हेतु ही बातमी रचून सांगण्यांत आपला असला पाहिजे.

नंद०— मोहिनि, दुःखाच्या कल्पनेनें अशी वेडी होऊन जाऊं नकोस. मला द्वितीय संबंध करावयाचा असता तर त्यांस तुझी मला आडकाठी थोडीच होती !

( चाल०—सखि अब कैसे करत है० )

भ्रम तव मनिं उपजावि शोक घोर । वच अनुचित
वद्‌वी कठोर ॥ ध्रु० ॥ चिर तुज भगिनीतुल्य
लेखिलें गणिसि कृतिसि या पाप थोर ॥ १ ॥
त्वदर्थ कठिन व्रत आचारिलें । रुससि तरि
जणुं अजाण पोर ॥ २ ॥

मोहि०— पण ही बातमी खरी तरी कशी ह्मणावी ? कंदन-महाराजांचें शरीर भीमाप्रमाणें दिव्य होतें. रोग त्यांच्या वाऱ्यालाही उभे रहात नसत. त्या वज्रासारख्या देहावर शत्रूचें शस्त्र पडलें तर देहाला इजा न होतां शस्त्रासच धार लागायची ! असें असतां

त्यांच्या प्राणावर प्रसंग कसा आला ? हो ! पण विसरलें! बाहेरून जसे आघात करितां येतात तसे आंतूनही येतात. माझ्याविषयींच्या विचारानें घरभेदीपणा करून त्यांच्या हृदयास आंतून अंगार लाविला असतां त्यांच्या शरीरानें किती दिवस टिकाव धरावा! महाराज, आपल्या चरित्रांत या वर्षी मोठा फरक पडणार होता ना ? त्या भविष्याची पूर्तता शेवटीं अशी केलीत !

( चाल—सखेरी हूं तो तज दुंगी० )

नृपकुलीं जनन चिरसुखविलासिं वसुनि अंतिं ये
निधन अधनसम अवचित रानीं । विधि किति
हतमति ॥ ध्रु० ॥ कठोर निजजन होइ जरी त्या ।
नवल न यम जरि कठिण हो स्वांतिं ॥ १ ॥

मंद०—हें पहा, आज त्याचें मला पत्र आलें आहे. त्यावरून सर्व उलगडा होईल. ( पत्र देतो ).

मोहि०—हेंच त्यांचें अक्षर. त्यांच्या शरीराची सगळी ऐट त्यांच्या अक्षरांत उतरली आहे; आणि त्यांच्या हृदयाप्रमाणें उदार आणि मोकळें ! जसे कांहीं मोत्यांचे सर पसरले आहेत ! पण आतां त्यांजवर अश्रुमौक्तिकांचा हार पसरण्यापलीकडे मी त्यांचा

बहुमान तो काय करणार? हरहर ! चांडाळा दैवा, काय हा मजवर गहजब केलास !

( चाल—धीरे धीरे धीरे धीरे० )

दर्शन घडलें नसतें दीनेसी जन्मभरीं । तरि
गणितें सौख्यची जरी वसतां सौख्यभरीं ॥ ध्रु० ॥
पुण्यवंत साधिलि तुम्हिं दुःखमुक्ति सद्गतिही ।
तीव्र यातना अगतिक सोसूं मी केशि परी ॥ १ ॥

( मूर्च्छित होते. )

नंद०—( मोहिनीस सांवरून व पत्र उचलून एकीकडे ) बाबा, आपण मोठ्या कौतुकानें केलेल्या विवाहाचा हा परिणाम पाहून स्वर्गांत आपणांला अतोनात दुःख होत असेल! आपण अमृताचें पान करीत असतां मोहिनीचे अश्रु विषबिंदूप्रमाणें तें नासून टाकीत असतील; व अप्सरांचें मधुर गायन मोहिनीचे अभिश्राप कर्णकठोर भासवीत असतील! आपण विवाहविधींत आमचे हात जुळविलेत. पण आमचीं हृदयें जुळविणें आपणांला शक्य नव्हतें. आपण मोहिनीच्या गळ्यांत मंगलसूत्र घातलेलें पाहिलें. पण त्यानें तिच्या गळ्यास फांस लागेल अशी आपणांस कल्पना झाली नाहीं.

विवाहप्रसंगींचा हिचा कोपमूलक मुग्धपणा आपणांस लज्जामूलक वाटला. बाबा, आपल्या इहलोकच्या वसतींत आमच्या विवाहाची विघडलेली घडी मी आपल्या दृष्टीस पडूं दिली नाहीं. पण आतां आपणांस सर्व गोष्टी अंतर्ज्ञानानें कळून चुकल्या असतील. कृपा करा, आणि संसाराटवींत निष्प्रेम आणि एकटा संचार करणाऱ्या मला आपल्या चरणांपाशीं न्या, ह्मणजेच मला शांति मिळाली तर मिळेल. ( जातो. )

कंदन ( प्रवेश करून )–( स्वतःशीं ) अरेरे ! काय ही बिचारीची दशा ! ( मोहिनीस सावध करूं लागतो. )

मोहि०—( सावध होऊन ) हं, दूर व्हा ! ज्या देहाला आजपर्यंत कोणाही पुरुषाचा विटाळ झाला नाहीं, त्याला अशा प्रसंगीं सावरण्याकरितांही स्पर्श करूं नका !

कंद०—मोहिनि, मला ओळखलें नाहींस का ?

( चाल–सुन श्याम बिनती मोरी )

तव दास निकटीं उभा । योजाया त्या करिं न
विलंबा ॥ ध्रु० ॥ असत्य जरि या मानिसि वचना ।
अशरीरी अशि करुनि कल्पना । दे परिरंभा ॥ १ ॥

मोहि०— अगबाई ! हें कोण ?

कंद०— अजून नाहीं ओळखलेंस ?

( चाल–रघुविर आज रहो० )

स्मृति मम काय बुजाली । सकलहि ॥ ध्रु० ॥
ज्योति प्रेमाची उज्ज्वल ती। कालें काय विझाली
॥ १ ॥ स्थित तव हृन्मंदिरिं मम मूर्ति । सुमनीं
लुप्तचि झाली ॥ २ ॥

( दाढी काढतो )

मोहि०— या दाढीनें मी फसलें ! अहाहा !

( चाल–पानि आज भरन गइ० )

रसना जड हो मति मूढ सकल आनंदें । अजि
धन्य खचित दिन निधनवचन परिसत तंव
अवचित हा मुखचंद्र सुखा दे ॥ ध्रु० ॥ घोर
संशयीं मन्मन बुडलें । पूर्व सुकृत मम आजी
फळलें । निद्रित कीं स्वप्न असे पडलें । भ्रमत
मन स्वच्छंदें ॥ १ ॥

मग आपणांबद्दल अभद्र वार्ता ऐकिली ती खोटी तर ?

कंद०—यांत काय संशय! बाकी तुझ्या दृष्टीनें जरी मी जिवंत आहें तरी जगाच्या दृष्टीनें मी मृतवत्‌च रहाणार आहें.

मोहि०— ह्मणजे ?

कंद०— ह्मणजे असें कीं मी जिवंत आहें अशी जर लोकांची कल्पना झाली तर ज्या स्वर्गसुखावर माझी सारी आशा त्याला अंचवून मी मृततुल्य होईन; व मी मृत आहें असा जर मला जगाचा समज उत्पन्न करितां आला तर मात्र मला जिवंतपणींचें उत्तमोत्तम सुख लाधणार आहे.

मोहि०— अजूनही माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं.

कंद०—अगे, माझ्या लक्ष्यांत यावयास दहा वर्षें लागलीं तर तुझ्या लक्ष्यांत चटकन् कोठून येणार ? सांगतों ऐक. तुझ्या लक्ष्यांत तुझ्या लग्नाचा दिवस असेलच ?

मोहि०— माझ्या हृदयावर तो दिवस डागण्या देऊन उमटविला आहे; तो मी विसरूं कसा ? माझ्या अंत्यविधीस शोभण्यासारखी ती घटादि सामुग्री, चितेप्रमाणें वाटणारा तो होम, विलापांप्रमाणें भासणारीं तीं मंगलाष्टकें, या गोष्टी माझा खरोखरीचा अखेरचा दिवस येईपर्यंत नष्ट होणार नाहींत.

कंद०— त्या दिवशीं नंदनापेक्षां एक क्षण अगोदर जन्म मिळाल्यामुळें माझ्या साऱ्या जन्माचें जें नुकसान झालें तें या क्षणीं माझ्या दृष्टीसमोर उभें राहिलें आहे ! मोहिनि, आम्हा

दोघांमधून या सुंदर जगावर प्रथम दृष्टि फेंकली मींच. मातेला पुत्रजन्माचा अभिमान वाटावयास लावून तिचें प्रथम स्तनपान केलें मींच. एक क्षण कां होईना, मला नंदनापेक्षां जगाचा अनुभव अधिक. त्याचा जन्म दिवसाच्या पहिल्या क्षणीं झाला असता तर मी त्याच्यापेक्षां एक दिवस अगोदर जन्मास आलों असतों. या सगळ्या गोष्टी उघडउघड दिसत असतां दरबारच्या पंडितांनीं नुसत्या जीर्ण पोथ्यांच्या आधारावर मला धाकटा व कंदनाला मोठा ठरविला. वस्तुस्थितीचा हा जो विपर्यास त्यांनीं केला त्याचे सगळे परिणाम मला भोगावे लागले.

**मोहि०**— त्या मेल्या ज्योतिष्यानींही दरबारी पंडितांच्या निर्णयाला त्या वेळीं दुजोरा दिला. पण मेले सगळे एका माळेचे मणि !

**कंद०**— मूर्खांनीं तुझे आणि नंदनाचे छत्तीस गुण जमतात ह्मणून सांगितलें !

**मोहि०**— छत्तिसाचा आंकडा आहे खराच !

**कंद**— सगळे बेटे धनराशीला भुलून वृषभ बनून गेले, आणि सिंहाचा निकटचा संबंध तोडून कन्येचा मेषाशीं योग जमविण्याला तयार झाले ! वधूवरांचा एकही गुण जमत नाहीं हें

सहज कळण्यासारखें होतें! पण या पढतमूर्खांनीं, विद्यारूप साखरेच्या गोण्या वाहणाऱ्या या बैलांनीं, वधूवरांच्या वास्तविक गुणावगुणांचा विचार न करितां दोन कागदांवर ओढलेल्या रेघोट्या पाहून विवाहनिश्चय केला. पृथ्वीपासून लाखों कोसांच्या अंतरावर आम्हां क्षुद्र मर्त्यांचा विचारही न करितां जे रविचंद्रादि गोल रात्रंदिवस अंतरिक्षाच्या रंगणावर शर्यत करीत आहेत त्यांचा आमचा बळेंच संबंध जोडून त्या संबंधाच्या बळावर ज्यांचा संबंध जोडूं नये त्यांचा संबंध जोडणें यापेक्षां दुसरा बाष्कळपणा कोणता असणार? त्या ग्रहांचें अजून पूर्ववत् परिभ्रमण चाललेंच आहे; पण त्या वधूवरांच्या व त्यांशीं संबंध असलेल्या इतरांच्या जन्माची मात्र माती झाली! या मूर्खांना इतकें कळण्याइतकाही सारासारविचार राहिला नाहीं कीं नंदन व मी एकाच क्षणाच्या अंतरानें जन्मलों असूनही आमच्या स्वभावांमध्यें जर कांहींचेंही सादृश्य नाहीं तर जन्मकालावरून भूतभविष्यत्कालीन गोष्टी अचुक सांगण्याचा आव घालणें हा निव्वळ मूर्खपणा आहे. आह्मा जुळ्यांचे परस्परविरोधी स्वभाव हें साऱ्या ज्योतिषाचें एक प्रकारचें खंडनच होय. काय चमत्कार आहे पहा!

( चाल—जडशिले जलीं न्हाणिलें )

जन असंभवा मानिती । परि सुसंभवा नच
आदरिती ॥ ध्रु० ॥ गदीं गुटिकामणि योजिती ।
स्तवीति हित तरि मणीप्रती । अपाय तरि अगद
निंदिती ॥ १ ॥

असो; आळशावर जशी गंगा चालून यावी त्याप्रमाणें नंदनानें जन्माला येण्याची सुस्ती करूनही त्याच्या वाट्याला राज्यलक्ष्मी व तिजपेक्षां मोलाची तूं आलीस; आणि माझ्या कपाळीं वनवास आला. मी राज्यलक्ष्मीबद्दल पर्वा केली नसती; कारण तुला राजविलासांत ठेवण्याचें साधन येवढीच मी तिची मातब्बरी समजत होतों. पण तूं जेव्हां माझ्या वाहूतून कायमची नाहींशी झालीस तेव्हां मात्र सगळें जग मला अंधकारमय झालें. मोहिनि, तुला आपल्या बाललीला आठवतात ना ? त्या वेळीं आपण पुढें अमुक करूं, तमुक करूं असे हजारों कल्पनातरंग व मनोरथ चालवीत असूं. ते सर्व ऐकून भवितव्यतादेवीस हंसूं येत असेल ! कारण लवकरच ते भंगून जाणार होते. मोहिनि, तुझ्याकरितां माझा आणि माझ्याकरितां तुझा जन्म आहे ही गोष्ट अंधळ्यासही दिसली असती. तुला प्रत्येक गोष्टींत अर्ध्या वांट्याची भागीदारीण कर-

ण्याची मला हौस. परंतु बाबांनीं तुला अर्धांगी करण्याचें समाधान मात्र मला राहूं दिलें नाहीं. या गोष्टीनें अंगाचा कसा तिळपापड होतो! बाबांना तर त्यांच्या अक्षम्य अपराधाबद्दल लवकरच प्रायश्चित्त मिळालें. रहातां राहिला मंदार. त्याचा सूड उगविण्याची माझी वासना दिवसेंदिवस बळावत चालली. मी हळूं हळूं एक भिल्लांचें सैन्य जमा केलें, आणि त्याच्या साह्यानें त्याचें राज्य हरण करून त्यास अरण्यांत मुलीसह पिटाळून लाविलें.

मोहि०— तर मग भिल्लांचे इंद्रजाल नांवाचे राजे आपणच!

कंद०— इंद्रजाल या नांवावरूनच तो कोण हें माझ्या मोहिनीच्या लक्ष्यांत यावयाला पाहिजे होतें.

मोहि०— खरेंच!

कंद०— याप्रमाणें अपराधी माणसांस शिक्षा झाली खरी. पण माझें सुख जें एकदां अस्तंगत झालें तें पुन्हां उदयाला कसें यावें? एकदा असा विचार येई कीं, नंदनाला सिंहासनावरून व मंचकावरून गुप्तपणें उचलून त्याच्या ठिकाणीं रूपसादृश्याच्या जोरावर स्वतः अधिष्ठित व्हावें. पण तुझा देह पराधीन झाला असेल अशा कल्पनेनें तुझें समागमसुख मिळण्याची आशाच राहिली नव्हती.

आणि आह्मा भावाभावांच्या स्वभावांत जमीनअस्मानाचें अंतर असल्यामुळें माझें कपट तेव्हांच उघडकीस येईल अशी भीतिही वाटत होती. यामुळें मी आजपर्यंत पूर्णपणें उदासीन राहिलों. परंतु कित्येक वर्षांत न पाहिलेली तुझी रमणीय मूर्ति एकवार तरी फिरून पहावी ही इच्छा अलीकडे प्रबळ होऊन मीं राजवाड्यांत प्रवेश करून घेतला, व तेथें ज्या प्रकाराची मला कल्पनाही नव्हती तो प्रकार दृष्टीस पडला. तूं अद्याप शुद्ध आहेस असें समजल्यावर रूपसादृश्याचा फायदा घेऊन युक्तीनें तुझी प्राप्ति करून घेण्याच्या मार्गाला मी लागलों.

मोहि०— पण स्वभावभेदाची अडचण कशी घालविणार ?

कंद०—स्वभावांत साहाजिकपणें क्रांति घडणें शक्य आहे काय असा विचार करीत असतां एका वैद्याकडून असें कळलें कीं मनुष्याच्या जिवावरील दुखणें येऊन गेलें ह्मणजे कधीं कधीं त्याच्या स्मृतींत, बुद्धींत व स्वभावांतही विलक्षण फरक पडतो.

मोहि०— पण या सर्वांचा उपयोग ते आजारी पडतील तेव्हांच ना ?

कंद०—तेवढ्याकरितां त्याला नगराबाहेर घालविणें अवश्य

होतें; व तें काम माझ्या पत्रानें माझ्या अजमासाप्रमाणें घडवून ही आणिलें. आतां पुढचा मार्ग सोपा आहे.

**मोहि०**— तो कसा ?

**कंद०**—त्याच्याशीं कांहीं तरी कुरापत काढून त्याला असा एक निसटता वार करायचा कीं त्यानें गतप्राण न होतां नुस्तें आजारी पडावें, आणि त्याच्या अत्यवस्थ स्थितींत त्यास उचलून नेऊन त्याचे जागीं आपण पडून रहावयाचें, ह्मणजे या अदलाबदलीचा कोणास सुगावा न लागतां स्वभावभिन्नत्वामुळें-ही तिचा संशय कोणास येऊं नये.

**मोहि०**—अगबाई, काय हें धाडस ! आपल्या स्वभावाला पूर्णपणें शोभतें. पण हें सारें अगदीं अपूर्व असल्यामुळें मला बाई त्याच्या कल्पनेनेंच धडकी भरते ! मी जरी अजून वास्तविक कुमारिकाच आहें तरी जनाच्या दृष्टीनें आपली भावजयच ना ? हें केवढें घोर पाप करण्याला आपण तयार झालां आहांत !

**कंद०**—मोहिनि, तूं सुद्धां अशी वेडगळ कल्पना काढावी ना ? तूं आणि नंदन परस्परांपासून इतकीं भिन्न असतां ज्यांनीं एका दाव्यांत बांधण्याचें धाडस केलें त्यांच्या मूर्खपणाची दुरुस्ती करणें पाप होतें कीं काय ? ईश्वराच्या दृष्टीनें तूं अजून कुमारिकाच आहेस.

भटांच्या अर्थशून्य मंत्रपठनाच्या बळावर तुला नंदनाची पत्नी ईश्वर तरी समजणार नाहीं. अशा बडबडीनें जर विसंगत हृदयें विवाहरज्जूंनीं बद्ध होऊं लागतील तर उथळ पाण्याच्या खळखळीनें तटावरील पुष्पाचें पाषाणाशीं लग्न कां लागूं नये ? घों घों वहाणाऱ्या वाऱ्याच्या बरळण्यानें इंधनाचा अग्नीशीं विवाह कां होऊं नये ? लग्न लागलें तें तुझें नंदनाशीं नाहीं, तर तुझ्या पत्रिकेचें त्याच्या पत्रिकेशीं मात्र लागलें. त्या पत्रिका सुखानें संसार करोत! आपण त्यांच्या सुखाच्या आड थोडींच येणार आहोंत!

**मोहि०**—दैवीं जे जे प्रकार व्हायचे असतील ते थोडेच चुकवितां येणार आहेत! आपणांला या वर्षासंबंधानें झालेलें भाकीत आठवत असेलच ?

**कंद०**— माझ्या आयुष्यांत या वर्षीं एक मोठें स्थित्यंतर घडून येणार हेंच ना ? खरेंच ! यापेक्षां दुसरें कोणतें स्थित्यंतर विस्मयकारक असणार आहे ? मोहिनि, या भाकितानें जर तुझें समाधान होऊन माझ्या कृत्याला तुझी अनुमति मिळण्यासारखी असेल तर मी क्षणभर तें खरें मानण्यास तयार आहें.

**मोहि०**— बरें, हें सगळें पार पडल्यानंतर त्यांची वाट काय करावयाची ?

कंद०— आपल्या सुरक्षितपणासाठीं व कांहींसें त्याच्याच सुखासाठीं त्याला जिवंत ठेवितां येणार नाहीं. कारागृहांत कुजत पडण्यापेक्षां एकदम मरणें शतपट बरें. त्याचा प्राण घेण्याचें काम मी स्वतः मात्र करणार नाहीं; तडागासारख्या विश्वासू सेवकाकडून करवीन ह्मणजे झालें. ही जी नंदनाची जीवितहानि मला करावी लागणार तिचा वचपा मी त्याचें नांव जगभर गाजवून काढून टाकीन. तो जरी देहानें मरण पावला तरी कीर्तिरूपानें नेहमीं जिवंतच राहील. माझें खरें नांव ज्या माणसाला माहित असावें अशी माझी इच्छा, त्याला तें माहित असल्यावर सारें जग मला जरी नंदन किंवा पशुहि समजूं लागलें तरी मला त्याची पर्वा नाहीं. तूंच मला जगाच्या ठिकाणीं आहेस. तुझ्या कटाक्षांपुढें नक्षत्रें व तुझ्या मुखापुढें चंद्रमंडळ मी तुच्छ मानितों. तुझें औदासीन्य हेंच माझें ग्रहण व तुझी प्रसन्नता हीच माझी ज्योत्स्ना !

मोहि०— बरें, आपण आज या महालांत प्रवेश करून घेतलांत तो कोणाच्या मदतीनें ?

कंद०— तडाग ह्मणून जो माझा एकनिष्ठ सेवक मीं नुकाच सांगितला, त्याची तुझ्या एका दासीशीं मैत्री होऊन तिच्या मदतीनें माझा येथें रिघाव झाला. मोहिनि, आपल्या सुखास साधनीभूत

झालेल्या त्या दासीवर राग न करितां तूं तिला क्षमा केली पाहिजे. ( मोहिनी मानेनें संमति दर्शविते ) आतां मला लवकर येथून गेलें पाहिजे. कारण एक तर उदईक सकाळीं नंदनाचा पाठलाग करण्याच्या तयारीनें असलें पाहिजे; आणि दुसरें असें कीं मी आणखी कांहीं वेळ येथें घुटमळलों तर मी तुझ्या कटाक्षजालांत कायमचा गुंतून पडेन. तुझ्या दर्शनानें या महत्कृत्याला उद्युक्त केलें खरें; पण त्या दर्शनाचा फार आस्वाद घेतला तर माझा सारा उत्साह निघून जाईल. कांहीं मात्रा अशा जालीम असतात कीं त्या थोड्याच प्रमाणांत घ्याव्या लागतात. ( जातो )

मोहि०— ( स्वतःशीं ) यांच्या अशा धाडसामुळेंच यांच्यावर माझें निस्सीम प्रेम बसलें आहे.

( चाल— सखे कोई शामसे० )

स्त्रिया नरीं साहसाचि आदरिती । रणांगणीं
कीर्तिही तया वरिती. ॥ ध्रु० ॥ उचित योषितांसी ।
भीरुता अलंकृति जशि ॥ विडंबिते नरमुखा
कलंकचि ती ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

अंक पहिला समाप्त.

---

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

( तडाग व पुष्करिणी )

पुष्क०— मग राहिलें ना लक्ष्यांत राणीसाहेबांशीं कसें बोलायचें तें ?

तडा०— न राहून कसें चालणार? बाकी विनंति, प्रार्थना, कृपा, क्षमा हे दरबारी शब्द माझ्या तोंडांत नीट बसतच नाहींत. इतकें मऊ बोलण्याचा जन्मांत हाच प्रसंग !

पुष्क०— पण नुस्ता याच शब्दांचा वर्षाव करायचा नाहीं बरें ! नाहीं तर तो केवळ तोंडपुजेपणा वाटायचा. मधून मधून स्पष्टवक्तेपणाही दाखविला पाहिजे.

तडा०—हां, तें माझें काम ! मात्र दरबारी आणि लष्करी शब्दांचा माझ्या तोंडांत झगडा होऊन ते खिचडीप्रमाणें वाटेल तसे मिसळून न जावोत ह्मणजे झालें !

पुष्क०— तसेंच मधून मधून स्वतःची स्तुतिही केली तरी ती वीराला शोभूनच जाईलच.

तडा०— तें तूं नको मला शिकवायला ! पुरुषांना माहित नसून बायकांनाच माहित असें कांही सांगायचें राहिलें असेल तर सांग.

पुष्क०— बायको कितीही मानी किंवा लाजाळू असली तरी तिला स्वतःच्या रूपाची स्तुति गोडच वाटते, हेंही लक्ष्यांत राहूं द्या. मात्र ती स्तुति नाजुक रीतीनें केली पाहिजे.

तडा०— या नाजूक शब्दांचें माझ्या डोक्यावर एक ओझेंच झालेलें आहे. तें मी केव्हां एकदां झुगारून देतों असें मला झालें आहे.

पुष्क०— या पहा आल्याच राणीसाहेब.

मोहिनी ( प्रवेश करून )–( स्वतःशीं )

( चाल–घरि घरि देखा० )

नामावरि सोडिती तिलांजलिसी । प्रेम विमल
याहुनि न दिसे मजसी ॥ ध्रु० ॥ त्यजि नामास्तव ।
रमणी राघव । नाम परि मदर्थे सोडिलें हर्षी

॥ १ ॥ मी दे प्रेमा । गुरुजन नामा । गुरुहूनि
गुरु मानिलि मत्प्रीति अशी ॥ २ ॥

पुष्क०— ( एकीकडे ) यांना बोलण्याचा सुमार नाहीं; यामुळें फार धास्ती वाटत आहे.

मोहि०—पुष्करिणि, हा ग कोण ?

पुष्क०—राणीसाहेब, हे कंदनमहाराजांचे एकनिष्ठ सेवक. यांच्याबद्दल त्यांनीं आपणांला सांगितलेंच आहे. मींही या पायांपाशीं विनंति केली आहे. हे आपल्यापाशीं एक विनंति करायला आले आहेत.

तडा०— बाईसाहेब, आपल्या पायांची भेट घेण्याला आलों, पण आपल्या चेहऱ्यांतच डोळे गुंतून राहिले याची माफी असावी. आमच्या मालकांनीं आपल्या रूपाची तारीफ केली ती अगदीं खोटी नाहीं. असे पाटीभर दागीने असल्यावर कोण कुरूप दिसणार आहे ? आज मी आपणांकडे आलों तो एक विनंति करण्याकरितां.

मोहि०— ( एकीकडे ) कोण बाई हा पांचटपणा ! आणि हा ह्मणे त्यांचा एकनिष्ठ सेवक ! ( उघड ) हं, बोला तुमची काय विनंति आहे.

तडा०— विनंति ह्मटली तर चालेल. पण स्पष्ट ह्मणायचें ह्मणजे हट्टच आहे.

मोहि०— काय ह्मणतां ? हट्ट ?

तडा०— हट्टच नाहीं तर काय ! आमचे मालक मला नेहमीं आपला धाकटा भाऊ समजतात. तेव्हां आपण झालांत माझी भावजय. आतां धाकट्या दिरानें वडील भावजयीपाशीं हट्ट धरूं नये तर काय करावें ?

घुष्क०— ( एकीकडे ) शुद्धीवर आहांत ना ?

मोहि०— ( एकीकडे ) नोकरांस रहस्यें सांगितलीं ह्मणजे ते असेच डोक्यावर चढून बसावयाचे.

तडा०— वास्तविक पाहूं गेलें तर तुह्मांला आज्ञा करण्याचाही माझा अधिकार आहे. कारण नंदनमहाराजांची व्यवस्था लावण्याची नाजुक कामगिरी मालकांनीं मजकडे दिली आहे, आणि तुह्मांला सुखांत लोटण्याचें अर्धें अधिक श्रेय माझ्याकडेच येणार आहे. माझ्या मालकांशीं एकांतांत गुलगुल गोष्टी करितांना या गरीबाचीही आठवण असूं द्यावी.

मोहि०— ( एकीकडे ) स्वारी 'आपण' या संबोधनावरून 'तुह्मी' या संबोधनावर आली! ( उघड ) तुमची आज्ञा अजून मला कळली नाहीं.

पुष्क०— राणीसाहेब, आज्ञा नाहीं, विनंति.

मोहि०— गप बैस! आपल्या नवऱ्याला शहाणपण शिकवितेस कीं काय?

तडा०— हं राणीसाहेब, तें मात्र माझ्यापाशीं चालायचें नाहीं हो! बायकांचें शहाणपण चुलीपुढें. त्यांनीं वर मान केली कीं दिलाच पाठींत रपाटा! त्यांनीं पोळ्या खुशाल लाटाव्या आणि कढी मनमुराद उकळावी. पण जर का आमच्याकडून मानसन्मान लाटायलाउकळायला लागल्या तर मात्र तें मुळींच चालायचें नाहीं. त्यांची डाळ काय ती स्वैंपाकघरांतच शिजायची; आणि तेथेंच त्यांना मिरीं वाटायला मिळायचीं. त्या ताक घुसळण्याचें सोडून आमच्या कारभारांत ढवळाढवळ करायला लागल्या कीं त्यांना खांबाशीं बांधून जेरबंदानें घुसळल्याशिवाय आह्मी रहाणार नाहीं. त्यांनीं शालजोड्या पांघरून मारे वरातींत मिरवावें. पण आपला तोरा आमच्यापुढें मात्र मिरवितां कामा नये. मालक जेव्हां तुमच्यासंबंधानें तारीफ करीत, तेव्हां मी त्यांना बजावीत

असें कीं, ' मालकसाहेब, बायकोला डोक्यावर घेऊन नीट परिणाम लागायचा नाहीं. '

मोहिं०— ( एकीकडे ) झालें ! बहुवचनावरून एकवचनावर मजल आली ! ( उघड ) तुह्मी माझा अपमान करण्याला का इथें आलांत ?

पुष्क०— राणीसाहेब, माझ्याकडे पाहून क्षमा करा.

तडा०— बाईसाहेब, मी आपला शिपाईगडी ! या पुष्करिणीप्रमाणें ढोंगसोंग मला कांहींच साधत नाहीं. आतां आपला फार वेळ न घेतां थोडक्यांत सांगतों. मी या पुष्करिणीकरितां मागणी करण्याला आलों आहें. आतां ती रूपानें इतकी सुंदर नाहीं. पण मी आहें गुणांचा चहाता. मी रूपाला फारशी किंमत देत नाहीं. नाक नकटें असलें ह्मणून तें स्वैंपाकाच्या आड थोडेंच येतें !

मोहि०— पुष्करिणि, तूं जी निवड केलीस ती फार शहाणपणाची आहे खरी !

तडा०— कसची कसची ! मी आहें आपला यःकश्चित् ताबेदार !

पुष्क०— ( एकीकडे ) शाबास ! असेंच चालूं द्या आणखी कांहीं वेळ.

तडा०— आपली आज्ञा होण्याचाच उशीर, कीं ती मी अम-लांत आणिली ह्मणून समजा. कोणाचेंही शिर धडापासून वेगळें करायला सांगा, हा पठ्ठ्या तयार !

मोहि०— ( एकीकडे ) डोकें धडापासून वेगळें करण्याला सुरवात स्वतःपासूनच झालेली दिसते.

तडा०— माझ्या अंगीं थोडासा भिडस्तपणा आणि लाजाळूपणा नसता तर माझ्यामध्यें खोड काढायला जागाच नसती.

मोहि०— भिडस्तपणा ? ठीक ! आणि दुसरा दुर्गुण कोणता ह्मणालांत ?

तडा०— कां ? विसरलांत वाटतें ?

मोहि०— माझ्या स्मरणशक्तीला तुमचे दोन्ही गुण एकदम पचेनात.

तडा०— हां, तसें असेल कदाचित्. बरें, माझ्या अर्जाला, विनंतीला, प्रार्थनेला उत्तर ?

मोहि०— कंदनमहाराजांचा कार्यभाग तुमच्या मदतीनें पार पडला कीं ही पुष्करिणी तुमचीच आहे.

तडा०— राणीसाहेब, आपले फार उपकार झाले. ( मोहिनी जाते. एकीकडे ) मालक कांहीं ह्मणोत,पण राणीसाहेब जरा उद्धटच

खऱ्या. ( उघड ) का प्रिये, काम कसें फत्ते झालें ? मी तुला पहिल्यानेंच सांगितलें कीं तूं सगळें मजवर सोंपीव ह्मणून. शाबास माझी !

पुष्क०—शाबासकी कसली घेतां ? तुह्मीं सगळी घाण केलीत!

तडा०— त्यांनीं पूर्ण संमति दिली तरी घाणच ?

पुष्क०— त्यांनीं संमति दिली ती खुषीनें दिली नाहीं. तिरस्कारानें !

तडा०— असें असेल तर त्याचें सगळें खापर तुझ्या शिकवणी-वर फोडलें पाहिजे. विनंति, ताबेदार, माफी वगैरे शब्द तूं मजकडून तोंडपाठ करून घेतले होतेस. ते मध्यें मध्यें तोंडांत येऊन माझ्या शिपाईबाण्याच्या बोलण्याची अगदीं नासाडी करून टाकीत. ते शब्द नसते आले, तर माझें बोलणें एका थाटाचें झालें असतें.

पुष्क०— हो, सारें पोरकट थाटाचें झालें असतें खरें.

तडा०— खुषीनें देवो, जुलमानें देवो, राणीनें आपल्या ह्मणण्याला रुकार दिला येवढीच गोष्ट बस्स आहे. कसा दिला, कोणीं दिला, कां दिला, असा कीस काढणारा मी मनुष्य नव्हे. चल, जाऊं दे आतां; उद्यांची तयारी केली पाहिजे. ( तडाग व पुष्करिणी जातात. )

---

# प्रवेश २ रा.

—o—

नंदन— ( स्वतःशीं ) काय गर्द हें अरण्य ! शत्रूपासून संरक्षण करण्याला हा एक मोठा किल्लाच ह्मणावयाचा ! ही गगनचुंबित वृक्षमाला या किल्ल्याची शिबंदी असून हिंस्र पशु त्यांतील आयुधें होत. या ठिकाणीं एखाद्या मनुष्याला शोधण्यास लाखों लोकांचें सैन्य आलें तरी तो त्यास सांपडण्यापूर्वी तेंच नापत्ता होऊन जावयाचें ! कांहीं ठिकाणीं तर इतका गर्द अंधकार आहे कीं साऱ्या जगाला दिपविणाऱ्या सूर्यनारायणाच्या शुभ्र कीर्तीला तो एक कालिमाच आहे. हे वृक्ष वाढत्या वयाबरोबर जीर्ण न होतां अधिकाधिक उंच व विस्तीर्ण होत चालले आहेत. अनंत कालाच्या अंतीं कोसळणाऱ्या गगनास यांनीं वरचेवर झेलून धरिलें तर नवल वाटावयास नको. या अरण्यांतील टेंकड्याही उंच आहेत. परंतु विंध्यपर्वताप्रमाणें अंगीं विस्तार पावण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें, ज्या झाडांच्या हजार वर्षांपूर्वी त्या आया दिसत असतील त्यांच्याच त्या आज मुली शोभत आहेत.

( चाल—वेणू मधुरध्वनि )

भव्या अटवी किती । तरुंहिं भरली ही दृढतर
निज भुजिं पृथु तरुवर कवळिति । क्षितिसुताचि
सहज मज दिसाति ॥ ध्रु० ॥ ही धरणीकबरी ।
तत्प्रियपतिविरहविकलिता फिरवित कंकत बहु
दिन शिरिं न सती ॥ १ ॥

या निबिड अरण्यांत मंदारमहाराजांची झोंपडी मला सांपडली हें मी आपलें नशीबच समजतों. त्यांची धाकटी मुलगी इंदिरा ही तर येथील वनदेवीच भासते; आणि या कृष्ण अरण्यांत संचार करितांना मेघसंचारी विद्युल्लतेप्रमाणें चमकते. येथें आल्यापासून मला नगरवास सोडून जन्मभर येथेंच काळ कंठावासा वाटूं लागला आहे. याचें कारण काय असावें बरें ? हें निष्प्रेम अरण्य माझ्यासारख्या निष्प्रेम माणसाला योग्य आहे ह्मणून मला त्याबद्दल इतकें प्रेम उत्पन्न झालें आहे, कीं त्याच्या उदरांत प्रेमळपणाची केवळ मूर्तिच अशी ही इंदिरा वास करीत आहे ह्मणून ? माणसें बरेच दिवस अरण्यांत राहिलीं ह्मणजे रानवट होतात. परंतु इंदिरा जर येथें आणखी कांहीं दिवस राहिली तर ती या अरण्यास सुद्धां

माणसाळून टाकील. तिचा विनय पाहून हे ताठ वृक्ष सुद्धां लवतील; आणि तिचें मंजुळ गाणें ऐकून सिंह सुद्धां आपली गर्जना विसरतील, आणि प्राणिवधाचें नित्यकर्म झुगारून देऊन आपल्या दाढा अलंकार ह्मणून धारण करितील. मनुष्यांतील या राजकन्येनें वृक्षराजांवर व पशुराजांवर आपली सत्ता याप्रमाणें बसविली तर नवल काय ?

( चाल— कोण तुजसम सांग० )

योग्य कानन मोहण्या ही नारी । वनदेवीच
खरी । अंशमात्रें ईच्या राहि शरीरीं । वनसृ-
ष्टिहि सारी ॥ ध्रु० ॥ सिंहकटि गजगामिनी
कांतारीं । गजहरिवैर हरी । साधिते ही चाप-
भ्रू मृगनेत्री । मृगधनूंत मैत्री ॥ १ ॥ जीस
शुंडातुल्य भुज ऋजु भारी । कर कमलाकारी ।
नवल नच ती गजकमलांमाझारी । निर्मी प्रेम
जरी ॥ २ ॥

मला स्वतःलाही तिनें लवकरच आपलेंसें करून टाकिलें. या जन्मीं स्त्रीप्रेम माझ्या नशिबीं नाहीं; परंतु इंदिरेसारख्या सुशील मुलीचे

निर्मल प्रेम जर मला प्राप्त होईल, तर मी स्वतःला धन्य समजेन. हा कृत्रिम वेष टाकून देऊन मंदारमहाराजांस ओळख देण्याचें काम मी दिवसगतीवर ढकलूं लागलों आहें, याचेंही कारण इंदिरेच्या सहवासामुळें नगराला परत जाण्याविषयीं उत्पन्न झालेली अरुचि हेंच होय.

चंडी ( प्रवेश करून )—( स्वतःशीं ) यांच्या भ्रमिष्ट स्वभावाला करावें तरी काय ? माझी थोडीशी पाठ फिरली कीं डोळा चुकवून धूम ठोकिलीच ह्मणून समजावें ! हें सारें शहरांत ठीक होतें. पण त्यांच्या रंगेल स्वभावाला योग्य अशी या अरण्यांत एखादी अप्सरा माळ घालायला थोडीच टपून बसली आहे ! आतां शोधून काढितें. जातात कुठें ? ( फिरते )

नंद०— ( स्वतःशीं ) अरे, हा चंडीचा नवरा विहंग इकडे येत आहे; तेव्हां आपण जरा आड व्हावें.

विहंग ( प्रवेश करून )—( स्वतःशीं ) माझ्यासारख्या रंगेल माणसाला या अरण्यांत रहाणें ह्मणजे खराच वनवास आहे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत जरी पायांना शीण दिला तरी व्यर्थ ! एकही स्त्री दिसत नाहीं. अरण्यांत रहाणाऱ्या पूर्वीच्या ऋषिकन्यका साऱ्या मेल्या कीं काय ? कधीं कधीं शापांमुळें स्त्रिया

झाडांचीं किंवा लतांचीं रूपें घेऊन त्यांचा त्या रूपांपासून उद्धार करणारांची वाट पहात असतात, असें मीं पुराणांतरीं वाचलें होतें. माझ्याही स्पर्शानें एखाद्या उर्वशीला तिचें पूर्वरूप मिळेल या औदार्ययुक्त आशेनें मी आज किती तरी झाडांना घट्ट आलिंगनें दिलीं; पण बेटे सगळे कृतघ्न! हजारों झाडें मिळून एक तरी अप्सरा निर्माण व्हावयास पाहिजे होती. पण छे! उलट त्यांपासून मला अतोनात त्रास झाला. एका बाभळीच्या झाडाला कडकडून भेटावयाला गेलों तों त्या दुष्टानें आपलीं नखेंच माझ्या मांसांत खुपसलीं. नागिणीसारखी अप्सरा भेटेल ह्मणून एका चंदनाच्या झाडाला प्रेमानें विळखा घालायला गेलों तों नागोबाच फुस्स करून माझ्या अंगावर आले; आणि मला पळतां भुई थोडी झाली! एका लिंबाच्या झाडाचें चुंबन घ्यावयाला गेलों तों त्यानें तोंड कडूजर करून गुडीपाडव्याचा दिवस दाखविला! एकूण सारे वृक्ष बेटे एकापेक्षां एक दुष्ट! पण त्यांना शिव्या देऊन काय उपयोग! कारण तें सारें अरण्यरुदितच होणार.

चंडी— कां? इकडे कोणकिडे?

विहं०— शर्थ झाली बुवा तुझ्या मत्सरीपणाची! अग, जेथें खी औषधाला मिळायची नाहीं, तेथें सुद्धां तुझा मत्सर कायम

आहे ना ? झाडांत तरी एखादी अप्सरा लपलेली असेल, अशा भ्रमानें मीं आज किती तरी झाडांना कवटाळून पाहिलें. पण व्यर्थ! अनुरक्त स्त्री आढळण्याऐवजीं मी मात्र रक्तबंबाळ झालों. तूं माझी अर्धांगी. तेव्हां तुला या सुखाचा अर्धा भाग देण्यास मी कसा उतावीळ झालों आहें.

चंडी—जळो तुमचा तो अर्धा भाग ! निर्लज्जाप्रमाणें वर्तन करून वर त्याची फुशारकी मारतां काय ?

विहं०— रागामुळें तुझा चेहरा किती तरी सुंदर दिसत आहे !

चंडी— हो तर ! बायकांचा दुष्काळ पडल्यावर मीच तुह्मांला सुंदर दिसूं लागलें !

विहं०— तूं ह्मणतेस तें खरें. सुंदर, कुरूप वगैरे बारकाई पहावी शहरांत ! अरण्यांत इतका मार्मिकपणा दाखविला कीं प्रेम करण्याचें सामर्थ्यच वाळून कोळ व्हायचें ! जेथें मुळीं स्त्रीच दिसावयाची नाहीं, तेथें सुंदर बांध्याचा हट्ट धरून काय लाभ होणार ? शुभ्र दंत आणि काळे केंस यांनीं जरी आपल्या गुणांची अदलाबदल केली तरी ती प्रेमळ वनवाशाला कधीं उमगायची नाहीं. तसेंच भिंवया वांकड्या असावयाच्या त्या सरळ झाल्या आणि नाक सरळ असायचें तें वांकडें झालें तरी या गर्द अर-

ण्यांतील अंधप्रीतीला तो फरक कधीं दिसावयाचा नाहीं. ज्या ठिकाणीं मुळीं नाकच दिसावयाचें नाहीं, तेथें स्त्रियेचें नाक, मग तें किती का वांकडें असेना, सुंदर दिसलेंच पाहिजे. विननाकापेक्षां वांकडें नाक सुरेखच कीं नाहीं? अरण्यांत मार्मिकपणा दाखविण्याचा परिणाम नीट लागत नसल्यामुळें येथील पशुपक्षीही आपल्या रमणींमध्यें असलेल्या लहानसान व्यंग्यांबद्दल मनापासून क्षमा करितात. गेंडा आपल्या स्त्रियेच्या नाकावरच खूष होतो. हत्ती हत्तिणीच्या जाड कंबरेवरच भाळून जातो. अशीं किती तरी उदाहरणें देतां येतील. तर प्रिये, मदनाच्या अशा या निर्व्यंग्य विलासभूमींत तूं जर मला सुंदर दिसलीस, तर त्यांत नवल तें काय ?

चंडी— पुरे झाला हा चारगटपणा ! हा पांचटपणा जर पुढें चालू ठेवाल, तर नुकत्याच तोडलेल्या या वेतानें तुमची पाठ चांगली नरम करीन.

विहं०— वा ! मग तर सोन्याहूनही पिंवळें होईल ! लतेपासून स्त्रीचा लाभ मला जितका गोड वाटेल तितकाच स्त्रीपासून या वेत्रलतेचाही लाभ वाटेल, हें मी खात्रीनें सांगतों.

चंडी— लतेपेक्षां लत्तेचा ह्मणा !

नंद०— ( एकीकडे ) जिकडे पहावें तिकडे विषम विवाह ! अरण्यांत सुद्धां माझ्या मनाला शांति मिळण्याचा रंग दिसत नाहीं.

चंडी— बरें, आतां हा निर्लज्जपणा गुंडाळून ठेवून मला घरकामाला हात लावायला चला. इंदिराताईसाहेब राजकन्या असून सकाळपासून संध्याकाळपर्यंत खपत असतात; आणि तुम्ही नोकर असून राजाप्रमाणें टिवल्याबावल्या करीत हिंडतां. हें तुम्हांला शोभतें का ?

विहं०— जेथें बायको नवऱ्यासारखी वागूं लागली तेथें नोकराचा मालक झाल्यास काय आश्चर्य ! हं, चल बया तिकडे. मी जर आपखुषीनें आलों नाहीं, तर तूं ओढून नेल्याशिवाय थोडीच रहाणार आहेस ! मग मुकाट्यानें आलेलें काय वाईट? (स्वतःशीं)

( चाल— तुसे लागी नजरिया० )

जो विवाहिं फसला । चतुर्भुजचि तो बनला ॥
कीं चतुष्पद पुरा सजला ॥ ध्रु० ॥ स्वतंत्र-
मति नर कलत्रनिगडिं न नियंत्रितगति निप-
जला । जड माति परि उपजे त्याला । निज तनु
नखडवि वरुनि युवतिला ॥ १ ॥

( चंडी व विहंग जातात. )

नंद०— आईबापांनीं स्वभावभेदाकडे न पाहतां घडवून आणिलेल्या विवाहाचा हा परिणाम ! अशीं गंगाजम्नी जोडपीं घरोंघर किती तरी असतील ! प्रीतिविवाहांत सुद्धां क्वचित् वैषम्य राहून जातें, नाहीं असें नाहीं. परंतु प्रेमातिशयामुळें तें वैषम्य त्या जोडप्याच्यां नजरेस येत नाहीं. अशा जोडप्यांत कधीं कधीं प्रेमकलह होतात इतकेंच काय तें; पण तशा जोडप्यांत नेहमीं कलहप्रेम दिसून येतें. तशीं जोडपीं पाहिलीं ह्मणजे वाटायला लागतें,

( चाल—हरिपदावीण तुज कांहीं )

जगिं सुखी ब्रह्मचारी कीं । संन्यासाश्रम जो<br>राखी ॥ ध्रु० ॥ द्वैत दुःखमूलची असे तें अद्वैतीं<br>सुख सारें । पूर्ण सत्य संसारी त्यागी वदाति<br>अनुभवाधारें ॥ १ ॥ ज्या सदनीं पतिपत्नी<br>समगुण वागति बहु आनंदें । मंगल धाम खरें<br>विरल परी कलह अन्यथा नांदे ॥ २ ॥

—विचारांत मग्न झाल्यामुळें परत जाण्याची वेळ होऊन गेली हेंही मला कळलें नाहीं. ही पहा शुभ्रवर्ण, व्यवसायानुकूल, पुण्यसाक्षी दिवसाची कृष्णवर्ण, आलस्यानुकूल, पापसाक्षी अर्धांगी निशा सपा-

त्यानें जगतावर प्रवेश करीत असल्यामुळें तिचा पति वेगानें निष्क्रमण करीत आहे. या निबिड अरण्यास या विवशीचें साह्य मिळाल्यास माझी खास दिशाभूल होईल; ह्मणून येथून लवकर पाय काढावा हें बरें. ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

—o—

Loosing of Status

( मंदार व इंदिरा )

मंदा०— बाळे, माझ्या पदभ्रष्टतेमुळें माझी फारच अल्प हानि झाली आहे. कारण ज्याला या जगाला लवकरच रामराम ठोकावा लागणार, त्याला थोडेंसें अगोदर आपल्या सिंहासनाला ठोकावा लागला तर त्यांत त्याचें कोणतें विशेष नुकसान झालें ? इतकेंच नाहीं, तर वृद्धत्वामुळें विषयोपभोगांविषयीं आणि राज्यकारभाराच्या दगदगीविषयीं पूर्ण अरुचि उत्पन्न झाल्यामुळें मला स्थानभ्रष्ट करून दैवानें मजवर एक प्रकारचा उपकारच केला असें मी समजतों. पण बाळे, तुझें तसें नाहीं. तूं नुकाच तारुण्यांत प्रवेश केला आहेस. अजून तुला जगाचा अनुभव नाहीं; आणि ईश्वरकृपेनें आजपर्यंत

दुःखाशींही तुझी ओळख नव्हती. तुझ्यावर हल्लीं केवढें संकट आलें आहे, याची तुला नीट कल्पनाही नाहीं. अशा पर्वतप्राय संकटाशीं तूं अनाथ व एकटी कशी झगडणार ? आणि झगडून तुझा निभाव कसा लागणार ?

इंदि०— बाबा, माझ्यासाठीं मुळींच काळजी करूं नका. मला इथें काय कमी आहे ? तुमचें प्रेम जर मला इथें मिळतें आहे, तर मी अनाथ व एकटी कशी ?

मंदा०— इंदिरे, मी थोड्या दिवसांचा सोबती. माझ्यामागें तूं काय करशील ?

इंदि०— असें बोलूं नका बाबा. तुह्मी आपल्या मुलींचे संसार थाटलेले पाहीन असें ह्मणालां होतां, तें विसरलांत वाटतें ?

मंदा०— मनुष्य संकल्प करून जातो. पण पुरविणें असतें त्या जगदीशाच्या इच्छेवर. दहा वर्षें झालीं, कंदनाचा कुठेंही पत्ता नाहीं. त्याचा आणि तुझा विवाह केला असता ह्मणजे नातवंडें खेळविण्याचेंच काम मजकडे राहिलें असतें. तें सौख्य राहिलें एकीकडेच. उलट माझ्यामागें तुझें कसें होईल, ही चिंता मात्र माझ्यामागें लागली आहे.

इंदि०— तुह्मी जरी मला सोडून वर गेलांत, तरी तिथून तुमची कृपादृष्टि मजवर रहाणार नाहीं का ? तसेंच नीतीनें चालणाराला देव कधींही सोडीत नाहीं, असें तुह्मींच नाहीं का मला सांगितलें ?

मंदा०—या गोष्टी लहान मुलांना सांगण्याला ठीक आहेत; पण त्यांचा अनुभव संसारांत नेहमीं येतोच असें नाहीं.

इंदि०— मला बाई नेहमीं नीतीच्या विजयाचाच अनुभव आला आहे. आपल्या मनांत पाप नसलें ह्मणजे दुष्ट मनुष्याचा दुष्टपणा सुद्धां आपणांला बाधत नाहीं. फार कशाला! कालच मी झाडाच्या थंड छायेखालीं निजलें होतें. जागी होऊन पहातें तों एक नाग माझ्या डोक्यावर फणा काढून बसला आहे ! मला शेषशायी नारायणाची आठवण होऊन मी कौतुकानें सारखी त्याजकडे बघतच राहिलें; पण तो नाग मला उपद्रव न देतां सावकाश निघून गेला.

मंदा०— माझी बाळ मोठी भाग्याची आहे ! बाळे, अशा भलत्या स्थलीं जाऊं नये. सद्गुणाला कसलीही भीति नसेल कदाचित्. पण मी ह्मणतों विषाची परीक्षा पहा कशाला ? मला वचन दे पाहूं कीं पुन्हां आपलें झोंपडें सोडून एकटी कोठें जाणार

नाहीं. ( इंदिरा मंदाराच्या हातावर हात देते ) अरे, हाताला हे ओचकारे कसले ?

इंदि०— कांहीं नाहीं, बाबा. मीं चंडीला घरकामात थोडीशी मदत केली, त्यानें असें झालें असेल.

मंदा०— माझ्या दुर्दैवाच्या रेषा तुझ्या हातावर उमटल्या तर ? बरें, तुला इतका त्रास व्हायला विहंग कुठें गेला होता ? विहंगा, इकडे ये पाहूं !

विहंग ( प्रवेश करून )— महाराज, ताबेदार पायांपाशीं हजर आहे.

इंदि०— बाबा, जाऊं द्या त्याला.

मंदा०— हे पाहिलेस मालकिणीच्या हातावरील ओरखडे ?

विहं०— अरेरे ! हा सारा वनवासाचा प्रताप. माझ्याही अंगावर तसेच आहेत. ( एकीकडे ) बाभळीच्या झाडाचा प्रताप !

मंदा०— तुझ्या अंगावरचे ओरखडे असतील चंडीच्या नखांचा प्रताप !

इंदि०—गरीब बिचारा विहंग !

मंदा०— बरें, आतां तुला बजावून ठेवितों कीं, यापुढें इंदिरेच्या हातावर ओरखडे माझ्या नजरेला आले तर तुझ्या पाठी-

वर वळ उठतील; हें लक्ष्यांत ठेवून त्याप्रमाणें वर्तन राहिलें पाहिजे.

इंदि०— ( विहंगास एकीकडे ) विहंगा, होय ह्मण.

मंदा०— पहा किती निगरगट्ट आहे तो ! तोंडांतून एक शब्द तरी काढितो आहे का ?

विहं०— महाराज, मी ताईसाहेबांचा उदार स्वभाव पाहून विस्मयांत पडल्यामुळें कांहीं बोललों नाहीं, याची क्षमा असावी. अहाहा ! नोकरी करावी तर अशाच यजमानिनीची करावी.

मंदा०— ह्मणजे स्वतःला काम करायला नको !

इंदि०— विहंगा, बाबांचा राग गेला बरें ! जा तूं आतां. ( विहंग जातो ) बाबा, हीं गरीब माणसें आपलें घर सोडून आपल्या विपत्तींत आपल्याबरोबर आलीं हा विचार आला कीं कसें भडभडून येतें.

मंदा०— आपले इतर आश्रित जर हळूं हळूं जमूं लागतील तर स्वारीची तयारी करण्यास ठीक पडेल.

इंदि०— कांहीं नको ती स्वारी आणि तें राज्य ! परिणाम ठीक झाला तर बरें. नाहीं तर आहे हें सुद्धां आपण गमावून बसूं.

आणि आहे हें काय कमी आहे का ? काय असेल तें असो. मला राजधानीपेक्षां येथेंच राहण्यांत सुख वाटतें. इथें कृत्रिमपणाचा गंधही नाहीं. सगळें स्वाभाविक ! आणि स्वतंत्रता तरी किती !

( चाल—सखये अनसूये थांब० )

पसरे चोंहिकडे गंध तरूंचा । गंध न ज्यां मनुज-
कराचा ॥ मनुजोच्छ्वासांचें ज्यां नच वारें ।
स्वच्छंदें वाहति वारे ॥ परके असती जे मनुज-
रवांना । पक्षी ते गाती गानां ॥ धरणी मनुजाच्या
स्पृष्ट न पायीं । नभ सौधीं खंडित नाहीं ॥ वन हें
पांचूचें रत्न धरेचें । संस्कारें भ्रष्ट न साचें ॥ १ ॥

मंदा०— परवांपासून जो एक पाहुणा आला आहे, तो कोण असावा असा तुझा तर्क आहे ! कोणी शत्रूकडचा हेर तर नाहीं ना?

इंदि०— मला नाहीं वाटत तसे असतलिसे. त्यांचें वर्तन किती सभ्यपणाचें आणि गोड आहे ! मला तर वाटतें कीं त्यांच्यावर नुक्तेंच कोणतें तरी संकट आलें असावें. त्यांचा संशय येण्याऐवजीं मला त्यांची कींव येते.

मंदा०— इंदिरे, तुला सगळें जग स्वतःप्रमाणें साधेंभोळें दिसतें.

इंदि०— बाबा, तुह्मीं त्या पाहुण्यांचे डोळे नाहीं का पाहिले. किती निष्कपट आणि प्रामाणिकपणाचे आहेत ?

( चाल—ये चाल तोरी न मातु० )

नेत्र शरीरिं गवाक्ष बिलोरी। निरखि जीव ज्यांतुनि बाहेरी ॥ ध्रु० ॥ स्पष्ट विषय दाविति आत्म्यातें। इतरां आत्मा तेंवि विकारी ॥ १ ॥

मंदा०— हे पहा आलेच ते पाहुणे. ( नंदन प्रवेश करितो, त्यास उद्देशून ) यावेंत ! आपण येऊन दोन दिवस झाले. पण अजून आपलें नांव गांव कांहींच कळलें नाहीं. आपल्या सभ्य वर्तनावरून आपला विशेष परिचय व्हावा अशी इच्छा आहे. पुरी करणें आपणांकडे आहे.

नंद०— आपण मजबद्दल चौकशी न करितां एकदम मला आश्रय दिलांत या आपल्या उदार वर्तनाचें अनुकरण करून मींहि आपणांवर विश्वास ठेवावयाचा. तो जर ठेविला नाहीं तर तें अत्यंत कृतघ्नपणाचें होईल. पण त्याचबरोबर माझी अशीही एक विनंति आहे कीं, माझ्यासारख्या हतभागी मनुष्यास आपण केलेल्या प्रश्नाचें उत्तर देणें हें एक परम संकट वाटणार आहे. त्यांतून मुक्त कराल तर आपण केलेला उपकार द्विगुणित होणार आहे.

दुर्दैवी मनुष्याचें चरित्र पुष्कळदां त्याच्या नांवाच्या अगदीं विपरीत असतें. आईबाप हौसेनें मुलाचें मंगलसूचक नांव ठेवितात. पण त्यामुळें निष्ठुर दैवानें मनांत योजिलेलें अमंगल थोडेंच टाळितां येतें ! कांहींजण तर इतके निःसीम हतदैव असतात कीं, त्यांच्या सहवासानें किंवा नामोच्चारानें दुसऱ्यांवरही संकटें येतात. अशाच माणसांपैकीं मी एक आहें. मीं आपणांस आपला सहवास होऊं दिला हीच मोठी चूक केली. तिच्यांत आपलें नांव सांगून भर कशाला पाडूं ?

इंदि०— ( एकीकडे ) किती मर्यादशील यांचें भाषण हें !

नंद०— ज्या ठिकाणीं माणसांची गर्दी असते, तेथें व्यक्तिभेद दाखविण्याकरितां नामभेदाची जरूर असते. पण अशा घनघोर अरण्यांत कीं जेथें मनुष्याचा गंधही नाहीं तेथें नव्या मनुष्यास आपण सामान्यनामानें संबोधिलें तरी चालेल. आपण मला आपला पाहुणा ह्मटलेंत तर त्यांत मी आपला बहुमान झाला असेंच समजेन.

मंदा०— इतकें वैराग्य येण्याला आपणांवर विपात्ति कोणती आली हें तरी आपली हरकत नसल्यास ऐकण्याची इच्छा आहे.

नंद०— त्या विपत्तीचें वर्णन ऐकिलें ह्मणजे तिचें कित्येकांस महत्त्व न वाटतां उलट हसूं येईल. पण आपणांसारख्या सहृदय मनुष्यास तसें वाटणार नाहीं अशी माझी खात्री आहे. माझ्या विपत्तीचें नांव निष्प्रेमता! या विशाल जगांत माझ्यावर प्रेम करणारें किंवा माझें प्रेम आकर्षून घेणारें एकही मनुष्य नाहीं. हीच माझी व्याधि, हीच माझी चिंता आणि हीच माझी विपत्ति!

( चाल—रामभजनमें चौकस रहेना० )

प्रेमपिपासा निज शमवाया संचरें जगतीं ॥ध्रु०॥
ज्ञानसंचयीं हृदय रमेना विषयसुखाची ये खंती।
प्रेमाविण आनंद गमेना येइना शांति॥ १ ॥ प्रेम एक
विश्रांतिस्थल कीं सकल हेतु जेथें रमती। समा-
धान त्याविण नच मिळतां नर कष्टी होती ॥ २ ॥
भिन्न भिन्न बहु देश शोधिले भ्रमलों बहु मनु-
जावतीं। हताश हतमति होउनि येईं या स्थलीं
अंतीं ॥ ३ ॥

मंदा०— आपल्या स्वभावावरून या विपत्तीचा फारसा संभव दिसत नाहीं. असो. मजवरही हल्लीं एक मोठें संकट आलें आहे. पण ईशदयेनें आपण ह्मणतां त्या विपत्तीचा मात्र मला अजून अनुभव आला नाहीं. इंदिरे, मी ह्मणतों हें खरें आहे ना?

नंद०— यांच्यासारखी प्रेमळ कन्या आपल्याजवळ असतांना तो अनुभव कसा येणार ?

मंदा०— अगदीं खरें बोललांत ! माझ्या बाळेनें लडिवाळपणें मिठी मारली कीं बाह्य संकटें त्या तटाच्या आंत कशीं तीं फिरकतच नाहींत. ही मिठी नांवाप्रमाणें फार मधुर ! आणि इच्यांत विशेष हें कीं इतर गोड पदार्थांप्रमाणें इची मिठी कधीं बसत नाहीं. इच्यांत तृप्ति आणि अतृप्ति हीं एकाच वेळीं वसत असतात. माझ्या बाळेची मिठी ह्मणजे एक सुंदर फुलांचा हारच आहे.

नंद०— ईश्वर करो, आणि हें सुख आपणांस निरंतर लाभो !

मंदा०— तसें कुठलें व्हायला ! ही मिठी जितकी गोड तितकीच बेटी चंचल ! मगरमिठीच्या अगदीं उलट ! आज बापाच्या तर उद्यां नवऱ्याच्या आणि परवां मुलाच्या गळ्याभोंवतीं दिसून यायची !

इंदि०— ( हळूंच ) काय हें बाबा !

मंदा०— मीं खोटें काय सांगितलें बरें ? स्त्रियांचा चंचल स्वभाव वर्णिला इतकेंच काय तें, इंदिरे, स्त्रियांच्या प्रेमाविषयीं तूं एक गाणें ह्मणतेस तें ह्मण पाहूं.

इंदि०— मला बाई लाज वाटते !

मंदा०— या पाहुण्यांची इतकी कशाला लाज बाळगायला पाहिजे ? शिवाय यांचें या रीतीनें मनोरंजन करणें हा एक पाहुणचाराचाच भाग आहे.

इंदि०— बरें तर, तुमच्या इच्छेप्रमाणें कां होईना ! ( गाते )

( चाल–आजि शेवटचा लाभचि० )

हें प्रेम जरी लाधे मनुजालागीं । उच्छिष्ट सौख्य त्या स्वर्गीं ॥ ध्रु० ॥ तद्देहातें प्रिय जन जरि आलिंगी । वर्षतें अमृत जणुं अंगीं ॥ नर ज्या प्रेमें प्रियजनमस्तक हुंगी ॥नच सुरतरुकुसुमपरागीं ॥ प्रियजनमुखिंचें गुज ऐकुनि अनुरागी । सुरयुवतिगानही त्यागी ॥ ( चाल ) दुग्धाच्या रूपें बाला । चुंबनरूपें दयिताला । प्रत्यया प्रीति ये विमला । नर धन्यचि जो मग्न प्रेमतडागीं । उच्छिष्ट सौख्य त्या स्वर्गीं ॥ १ ॥

नंद०— ( एकीकडे ) अहाहा ! किती मधुर ! स्त्रीप्रेमाची वकीली अशाच सुंदर मुखांतून निघाली पाहिजे.

मंदा०— ( इंदिरेच्या डोक्यावरून हात फिरवून ) बेटा, गाण्याच्या श्रमामुळें तुला किती तरी घाम आला आहे !

नंद०— ( एकीकडे ) हे घर्मबिंदु नाहींत; तर प्रेमरसाचे तुषारच आहेत. हे चुंबण्याचें ज्याच्या नशिबीं असेल त्याच्यासारखा भाग्यवान् तोच. अरे, पण मी इच्या गाण्याच्या प्रवाहाबरोबर फार वहावत चाललों. मना, असें बेफाम होऊन जाऊं नकोस, व या पुण्यभूमीस न शोभणारे विचारही आणूं नकोस.

मंदा०—बाळे, तुला फार श्रम झाले. जा आतां, नीज जा. ( इंदिरा जाते ) मी इंदिरेबद्दल बोलूं लागलों कीं आपण मला वेड्यांत काढाल; पण स्नेहामुळें बोलल्यावांचून रहावत नाहीं. माझी इंदिरा माझ्या घराला शोभा देणारी एक हिरकणी आहे; माझ्या दुःखतप्त हृदयाची सांवली आहे; आणि माझ्या दुर्बल आत्म्याची काठी आहे. या अरण्यांत असंख्य वृक्ष आहेत, पण हिच्या तोंडावरची टवटवी एकांतही नाहीं; असंख्य कोकिला आहेत; पण हिच्या कंठांतलें माधुर्य एकींतही नाहीं. हिला सतत पहाणें, हिचे बोल नेहमीं ऐकणें हाच माझा हल्लींचा आवडता व्यवसाय आहे. याहून प्रिय असा दुसरा कोणता व्यापार असूं शकणार ?

नंद०— आपलें भाषण माझ्याच विचारांचें प्रतिबिंब असल्यामुळें मला त्यांत अत्युक्तिरूप भासण्यासारखें कांहीं नाहीं.

( कंदन, तडाग व शिपाई प्रवेश करितात. )

तडा०— मालकसाहेब, मी एकटा ज्ञातान्याचा आणि तरण्याचा समाचार घेतों; आणि दोघांना एकमेकांच्या सोबतीनें स्वर्गाची वाट चालायला लावितों.

कंद०— छट् छट् ! आपल्या मतलबाला हवा त्यापेक्षां अधिक रक्तपात करण्यांत कोणतें तात्पर्य ? लोकांचीं डोकीं उडविण्याऐवजीं स्वतःचें डोकें ठिकाणावर असूं दे.

तडा०— माझा आपला शिपाईबाणा ! शत्रु पाहिला कीं हाण टोला, येवढेंच काय तें मला ठाऊक.

कंद०— तडागा, असला अविचार येथें करायचा नाहीं बरें. नाहीं तर शत्रूचा बंदोबस्त करण्याऐवजीं मला तुझाच बंदोबस्त करावा लागेल.

तडा०— राहिलें ! हा वळवळणारा हात कमरेशीं बांधून टाकितों; मग तर झालें ना ? आतां तुह्मीं तो तोडून टाकिलांत तरी हलायचा नाहीं.

कंद०— मी आतां आंत जाऊन कांहीं तरी कुरापत काढितों.

विहं०— चोर ! चोर ! बाहेरचें दार फोडून आंत आले.

( मंदार व नंदन आपापलीं शस्त्रें सांवरतात. )

कंद०— आपला सुगावा लागला त्यांना. चला लवकर आंत. ( सर्व जण आंत प्रवेश करितात. )

नंद०— हं, कोण चोर येतात पाहूं ?

कंद०— आपल्या घराचा झाडा घेऊं द्या अगोदर. माझ्यापाशीं लपवालपवी चालायची नाहीं. झाडून सारीं रत्नें, जवाहीर काढा बाहेर.

मंदा०— प्रथम तुला या तरवारीचें पाणी दाखवितों, आणि मग रत्नांचें !

( चंडी हातांत कोलीत घेऊन येते. )

चंडी— थांचा मेल्यांनो, बायकांच्या अंगीं कसें पाणी असतें तें आतां दाखवितें. ( कोलीत फिरवूं लागते. )

विहं०— अरे बापरे ! आतां मोठी कठिण गत ! हिच्या कोलिताचा नेम चोरावरचा चुकून माझ्यावरच यायचा. ( पळून जातो. )

तडा०— अग डांकिणी, हा माझा हात अडकला आहे ह्मणून ! नाहीं तर त्याच कोलितानें तुझ्या लठ्ठ अंगाला आग लावून चांगली आतषबाजी केली असती.

चंडी— कोण रे मेल्या तूं माझी आतषबाजी करणार ?

कंद०— ह्मणतों ना सारें जड जवाहीरं काढा बाहेर ह्मणून ?

मंदा०— बाबारे, आह्मी गरीब माणसें आहोंत. आमच्यापाशीं जवाहीर कोठलें ? नाहीं ह्मणायला एक अमोल रत्न आहे. पण तुमच्यासारख्यांना त्याची काय किंमत !

कंद०— कोणतें तें रत्न ?

मंदा०— माझी मुलगी इंदिरा. बिचारी त्या खोलींत सद्गुणी मनुष्यांना सुलभ अशा निद्रेचा अनुभव घेत आहे.

कंद०— तर मग तीच खोली आह्मांला प्रथम शोधिली पाहिजे. तडागा, कांहीं तरी बहाणा करून आह्मांला चकविण्याचा यांचा बेत दिसतो.

नंद०— या देवीच्या मंदिराला तुमचे अपवित्र पाय मी कधीं लागूं देणार नाहीं. मग त्यापायीं माझा प्राण गेला तरी बेहत्तर !

( चाल—बीति जात बीति जात० )

पाहुं कोण धीट रिघत जो । अंतर्गेहीं । पावन
जें रमणीचरणांहीं । अनुतापानलिं तो नर भाजो ।
मनिं लाजो ॥ ध्रु० ॥ साहस हें जो करील
चरणीं । मृत होइल तो समजा तत्क्षणिं । सजतो
जो अंतकपाचारणिं । सयश जगतिं तयाचें
गाजो ॥ १ ॥

कंद०— ( एकीकडे ) शाबास, नंदना ! शौर्यांत तूं माझा भाऊ शोभतोस खरा.

मंदा०— अरे दुष्टा, माझ्या मुलीच्या निद्रेचा भंग करून तिची अमर्यादा करूं पहातोस काय? हें घे तर त्याबद्दल बक्षीस. (तरवार उगारितो )

नंद०— ( मंदाराच्या हातांतील तरवार धरून ) महाराज, अजून रक्तपात करण्याचा प्रसंग आला नाहीं. शिवाय ही पहा इंदिराही आलीच. बायकांच्या नजरेस रक्तपात पडणें योग्य नाहीं. ( इंदिरा प्रवेश करिते. कंदन नंदनाच्या पाठीमागून डाव्या हातानें त्याच्या डोक्यावर मुष्टिप्रहार करून उजव्या हातानें त्याला तरवारीचा वार करितो. नंदन पडतो. )

इंदि०— ( पुढें होऊन ) हं हं, हें काय झालें ? माझी लाज राखण्याकरितां पाहुण्यांना देहांतशासन मिळालें काय ! ( नंदनास सावध करूं लागते. ) चंडि, लवकर पाणी आण पाहूं.

मंदा०— दुष्टांनो, या बिचाऱ्याला मारून तुह्मीं काय मिळविलेंत ? हरहर ! बिचाऱ्याला मरण शेवटीं चोरांच्या हातून आलें ! चोरांनो, असे पहात काय उभे राहिलांत ? इंदिरेची खोली तुह्मांला शोधायची होती ना ? जा बाबांनो, आपली द्रव्यतृष्णा भागवा एकदांची !

कंद०— मी जागचे जागीं खिळलों याबद्दल आश्चर्य वाटूं देऊं नका. हा सौंदर्याचा निधि पाहून कोण थक्क होणार नाहीं ? या लावण्यवतीनें आपल्या तेजानें डोळे दिपवून टाकून चोराच्याच हृदयाची चोरी केली. आतां द्रव्य कोण हरण करील ? देवि, तुझ्या सौंदर्याच्या ठायीं हा दास लीन झाला आहे. मी या ठिकाणीं चोरी करण्याकरितां आलों खरा. परंतु तुझ्या रूपानें चोराचा सुद्धां साव करून सोडिलें ! आजपर्यंत चोरानें आपली वस्तु कोणालाही अर्पण केली नव्हती. पण हा बहुमोल रत्नांचा हार मी तुला अर्पण करितों. ( हार देऊं लागतो. )

इंदि०— दरवडे घालून मिळविलेली संपत्ति तुह्मांलाच लक्ष-लाभ असो !

कंद०— काय ? माझ्या देणगीचा अव्हेर ! असा अव्हेर आजपर्यंत कोणी केला नव्हता. पण तुझ्या सौंदर्याकरितां हा अव्हेरही तुला माफ करितों. आणखी कांहीं तुझी आज्ञा आहे का ?

इंदि०— या बिचाऱ्याचे प्राण वांचावे असें जर तुह्मांला वाटत असेल, तर इथून जितकें लवकर निघून जातां येईल तितकें लवकर जा.

कंद०— जशी तुझी आज्ञा. तडागा, या घरांतून लवकर निघून जाऊं या. मात्र जातांना येथें कोणत्याहि माणसाच्या अंगा धक्का लागतां कामा नये. ( कंदन, तडाग व शिपाई जातात. )

इंदि०— बाबा, माझ्यासाठीं यांनीं आपला प्राण दिला. आ.. कसें करूं ? मी आपला प्राण दिला तर यांचा नाहीं का हो येणार ? किती तरी यांचें सौजन्य आणि शौर्य ! मेल्यांनीं सगळें एका क्षणांत नाहींसें केलें. आणि हें सगळें माझ्यासारख्या क्षुद्र स्त्रिये-करितां !

( चाल— मैं तो उनको बचन देदे हारी. )

आश्रया या स्थला पातला हो । काय लाहो ॥

॥ ध्रु० ॥ प्रेमसंपादना मेदिनी । शोधिली अंतिं

आला वनीं । निधनकालीं निराशाच हो ॥ १ ॥
साह्य झालें न मुळिं आपणां । दुरित असुचें उगें
राहिना ॥ प्राण अपुले बळी घेइ हो ॥ २ ॥

मंदा०— मुली, हा विनाकारण आकांत काय मांडिला आहेस? याची जखम फारशी भयंकर नाहीं. उगीच ओझरती लागली आहे. कांहीं दिवस आजार काढावा लागेल इतकेंच काय तें.

इंदि०— तर मग हे जिवंत राहणार ? बाबा, मला बरें वाटावें ह्मणून तर नाहीं ना तुह्मी असें समाधान करीत ? नुस्ते आजारीच राहिले तर मी रात्रीचा दिवस करून यांची यमाच्या दाढेंतून मुक्तता करीन.

मंदा०— तुझ्या कुशलतेची मला खात्री आहे. मात्र याचीं जखम घट्ट बांधण्यास उशीर करितां कामा नये. पूस आपले डोळे आणि पाहुण्यांच्या शुश्रूषेला लाग.

( पडदा पडतो. )

---

# प्रवेश ४ था.

( चंडी व विहंग )

चंडी— तुह्मी आतांशा असतां तरी कोठें ? काल रात्रीं त्या चोरांच्या गडबडींत जे नाहींसे झालांत ते आज सकाळीं तोंड दाखविलेंत ! पुन्हां आज दुपारीं गिळल्यावर पाहुण्यांच्या जखमेकरितां औषधें आणण्याचें मिष करून जे गेलांत ते आतां तोंड दाखवीत आहांत !

विहं०— मी नाहीं तोंड दाखवीत ! तुझेंच तोंड दिसतें आहे. इतकें तोंड चालायला जीभ फार लांब असली पाहिजे.

चंडी— आणि माझें बोलणें निमूटपणें ऐकायला आपले कान त्याहूनही लांब असले पाहिजेत.

विहं०— वाटेल तें बोल. तुला क्षमा करण्याचें औदार्य माझ्या अंगीं भरपूर आहे.

चंडी— वाः ! तुह्मी कर्णाचे अवतारच कीं नाहीं ! हो, पण चुकलें. तुह्मीं कर्णापेक्षांही मोठे ! महाकर्ण, अतिकर्ण, लंबकर्ण !

विहं०— हें पहा, तूं पुरुष झाली असतीस आणि मी तुझी बायको झालों असतों, तरी सुद्धां तूं मजवर इतकें तोंडसुख घेतलें नसतें.

चंडी— माझें खेटर अडलें आहे अशी सुस्त, हलगर्जी, ऐदी बायको करायला! बोला पाहुण्यांकरितां किती वनस्पति गोळा केल्यात त्या?

विहं०— खरेंच सांगूं? रागावणार नाहींस तर सांगतों. अशी ये इकडे. हें पहा, मी औषधासाठीं सगळें अरण्य पालथें घातलें. पण त्यानें पायांत कांटे मोडून ते रक्तबंबाळ झाले. एखादी गुणकारी वनस्पति सांपडली कीं ती माझ्या पायांकडेच खपे. तेव्हां पाहुण्यांच्या जखमेकरितां औषध माझ्यापाशीं कसें उरणार, सांग पाहूं?

चंडी— ही आपली सबब खरी वाटावी ह्मणून करूं का आपलें अंग चांगलें रक्तबंबाळ?

विहं०— तुझ्यासारखी पतिव्रता तेंही करायला चुकायची नाहीं, अशी माझी खात्री आहे; पण माझ्यासारख्या कनवाळू नवऱ्यानें प्रेमाची अशी कसोटी पहाण्याचा प्रसंगच आणूं नये हें बरें.

चंडी— हं, चला ताईसाहेबांकडे, आणि त्यांना सांगा आपली ही खबर.

विहं०— ( चाल-मन हरवा मरोरी० )

नर बळी ह्मणाति परि बळी असति या अबलांचे ॥ध्रु०॥ शैशविं माता यौवनिं कांता । वृद्धपणींही सुता करिति नियमन त्यांचें ॥ १ ॥ गांजुनि यापरि सतीच मिरविति धन्यवाद बहु हारिति सतत परि नरसुखिंचे ॥ २ ॥

( जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

( मंदार व इंदिरा नंदनाजवळ बसलीं आहेत. )

मंदा०— पाहिलेंस का इंदिरे ? यानें आपलें नांव आपल्याकडून किती तरी गुप्त ठेविलें; परंतु ही बेटी दाढी याच्या बेशुद्ध स्थितींत तोंडावरून सरकून हिनें याचें खरें स्वरूप बाहेर पाडलें. आत्म-

घाताबद्दल यानें लिहून ठेविलेल्या पत्रानें तर निर्णयच झाला. उघड उघड कंदनच हा !

इंदि०— नंदनमहाराजही असण्याचा संभव आहे. त्यांचाही तोंडवळा असाच आहे आणि पत्रावरून पाहिलें तरीहि नंदन-महाराजच असावेत. कारण त्यांनाच उद्देशून हें पत्र पाठविलें आहे.

मंदा०— वेडी कुठची ! अग, नंदन असा अनाथासारखा का आला असता ? शिवाय त्याला आपलें नांव गुप्त ठेवण्याचें कांहींच कारण नव्हतें. इंदिरे, तूं मोठ्या भाग्याची कीं तुझी कंदनाशीं अशा अकल्पित रीतीनें गांठ पडून त्याची सेवा तुजकडून होण्याचा योग आला. विचारा प्रेमामुळें कसा झुरणीला लागला आहे. आतां त्याची प्रेमाची भूक भागविणें तुजकडेच आहे. मी तुला सांगायला पाहिजे असें नाहीं. बाकी अशी जर लाजूं लागशील तर त्याचें पथ्यपाणी नीट व्हायचें नाहीं.

इंदि०— बाबा, मी तुमच्या आज्ञेप्रमाणें वागण्याचें आपल्या-कडून होईल तितकें करितें. ( मंदार जातो. नंदनास उद्देशून ) महाराज, जी सेवा करण्याचें माझ्या मनानें घेतलें आहे ती पार पाडण्याला बाबांच्या आग्रहाची मुळींच जरूर नाहीं.

( चाल— मने सहाय करसे मुरारीरे )

मम लाज वांचवाया सजलां । हे प्राण वाहण्या
कालां ॥ त्या प्राणांस्तव त्यजिं लज्जा मी दोष
कवण तरि झाला ॥ ध्रु० ॥ निजलज्जावन
जीवाहुनिही मानितसे कुलबाला । प्राण देणें
उचित मजला । धांवुनि आपण परि आलां ॥ १ ॥

( स्वतःशीं ) आज ताप जरा कमी आहे. पण भ्रम आहे तसाच आहे. मधून मधून त्या चोराच्या नाइकाबद्दल बरळत असतात. अगबाई ! हे नाईकच इकडे आले वाटतें.

कंदन ( प्रवेश करून )—( स्वतःशीं ) मोहिनीच्या बहिणीचा माझ्याकडून मोठा अपराध घडला. त्याबद्दल मंदारमहाराजांचं क्षमा मागितलीच आहे. पण तिची मागायची राहिली आहे. तिचा अपमान ह्मणजे पर्यायानें मोहिनीचाच अपमान आहे. सारी रात्रं माझ्या मनांत हीच गोष्ट घोळत होती.

इंदि०— आपण बाबांच्याकडे आलांत वाटतें ?

कंद०— या प्रश्नावरून मीं येथून जावें अशी तुमची इच्छा दिसते.

इंदि०— मला वाटतें, काल आमच्या पाहुण्यांच्या प्राणावर घाला घालून त्याचे भयंकर परिणाम स्वतः पहाण्याची आपली इच्छा खास नसली पाहिजे.

कंद०— मीं जेव्हां तुमच्या पाहुण्यांवर वार केला त्या वेळीं तुह्मीं जवळ असाल अशी माझी कल्पना नव्हती.

इंदि०— अस्सें ! मी जवळ नसलें ह्मणजे आपल्याच उपकारकर्त्यांवर वार करायला कांहीं हरकत नाहीं !

कंद०— तो माझा उपकारकर्ता कसा ?

इंदि०— बाबांनीं तुमच्यावर तरवार उपसली होती. पण विनाकारण रक्तपात होऊं नये ह्मणून त्यांनीं ती वरचेवर झेलून धरिली. आणि या उपकाराबद्दल तुह्मी त्यांचे प्राण घ्यायला तयार झालांत ! फार उत्तम ! ! खरें ह्मटलें तर तुह्मी प्रत्युपकार करून त्यांचे उपकार फेडायला पाहिजे होते.

( चाल–हमवारिया० )

ऋणमोचना । कोणीहि मानी उदार कर्म ना ॥
ऋण दिलें न तरि तयासि वदति वंचना ।
तेंवी कृतघ्नता विडंबना । योग्या असेचि तीव्र
दूषणा ॥ ध्रु० ॥

कंद०— ( एकीकडे ) माझ्या वैऱ्याचा माझ्यावर उपकार झाला, आणि त्याची मीं कृतघ्नपणानें फेड केली असा हिचा समज घालविण्याकरितां जर कोणी माझा उजवा हात तोडून मागितला तरी मी देईन. ( उघड ) मला नीतिशास्त्राचा आजपर्यंत कधीं संस्कार नव्हता, तेव्हां हा प्रमाद होणें अपरिहार्य होतें.

इंदि०— हें समजण्याला कशाला पाहिजे आहे नीतिशास्त्र ?

( मागील पद पुढें चालू )

श्वानहि वागे कृतज्ञभावें । पाळि तयाच्या अवना
धांवे । ही हो पशूंमाजि कल्पना । करिती न ज-
ल्पना । चळताति अल्प ना । नीचीं परी ही न
भावना ॥ १ ॥

कंद०— एकूण मी श्वानापेक्षांही नीच झालों तर ! पण तुमचा आरोप अगदीं यथार्थ आहे; मी आपला दोष पदरांत घेतों. तुमच्या वडिलानीं मला क्षमा केलीच आहे, तशी तुह्मींही केली पाहिजे.

इंदि०— बाबांच्या क्षमेंत माझीही आलीच.

कंद०— बरें, हे मंचकावर असलेले दुसरे पाहुणे कोण ?

इंदि०— कां ? यांचाही समाचार घेण्याची इच्छा नाहीं ना

कंद०— इंदिराबाई, पुन्हां या घरांत तरवार धरायची नाहीं आणि धरलीच तर तुमचें रक्षण करण्याकरितांच धरायची असा मीं निश्चय केला आहे.

इंदि०— तुह्मीं हातीं तरवार धरिली नांहीं ह्मणजे आमचें रक्षण करण्याचा प्रसंगच येणार नाहीं.

कंद०—तुमचा विश्वास माझ्या ठायीं कोणत्या शब्दांनीं उत्पन्न होईल हें मला कळलें तर बरें होईल.

इंदि०— कृतीनें घालाविलेला विश्वास कृतीनेंच परत आणिला पाहिजे. तें असूं द्या. पहिल्यानें तुमच्या प्रश्नाचें उत्तर देतें. कालचे आमचे पाहुणे आणि हे पलंगावर पडलेले गृहस्थ एकच आहेत. स्वरूपामध्यें जो हा फरक दिसतो आहे तो कृत्रिम दाढीमुळें उत्पन्न झाला होता.

कंद०— हा चेहरा कधीं तरी पाहिल्यासारखा दिसतो.

इंदि०— ( एकीकडे ) हे यांना नंदनमहाराज तर नाहीं ना समजणार ? तसा जर यांचा समज झाला तर न जाणों निराळेंच

काहीं अरिष्ट उभें रहायचें ! ( उघड ) यांचें नांव कंदनमहाराज. हे नंदनराजाचे कनिष्ठ बंधु; दुर्दैवी व निराश्रित आहेत.

कंद०— ( एकीकडे ) हा कंदनच आहे असा त्याचा समज आहे तर ! नंदना, असा पदोपदीं माझ्या आड कां येतोस ? माझें हक्काचें राज्य व हक्काची स्त्री लुबाडून वर माझें नांव लुबाडायला पहातोस काय ? पण काहीं हरकत नाहीं. मीच मागेंपुढें आपल्या नांवाला तिलांजलि देणार आहें. मग त्याचा वृथा अभिमान धरून काय फायदा ? ( उघड ) कंदनमहाराजांच्या स्वभावाबद्दलची कीर्ति आपल्या कानांवर आली असेलच ?

इंदि०— ती कोणती ?

कंद०— ( एकीकडे ) स्वमुखानें आपलीच निंदा करायचा कसा उलटा प्रसंग आला आहे पहा ! ( उघड ) ते फार तुसडे आहेत; बढाईखोर आहेत; स्वतःची तारीफ करण्याची त्यांना फार हौस. तसेच ते पहिल्या प्रतीचे चिडखोर आणि हेकेखोर आहेत. त्याचप्रमाणें ते परस्त्रीलंपट असून धर्माचा आणि नीतीचा त्यांना अगदीं विधिनिषेध नाहीं.

इंदि०— ( एकीकडे ) किती मत्सरी पुरुष आहे पहा !

कंद०— हें मीं त्यांजबद्दलचें लोकमत सांगितलें; पण यांत तथ्य मुळींच नाहीं.

इंदि०— हें तुह्मीं लवकर सांगितलेंत ह्मणून बरें झालें. नाहीं तर तुमचें मन दुखविण्याचा मला प्रसंग आला असता.

कंद०— ( एकीकडे ) स्वनिंदेचा माझा पहिला प्रयत्न तर सपशेल फसला ! आतां पुन्हा एकदां करून पाहूं. ( उघड ) आतां मी नुकाच त्यांजविषयीं सांगितलेला लोकापवाद जरी खोटा असला तरी त्यांच्या अंगीं कांहीं अक्षम्य दुर्गुण आहेत खरे.

इंदि०— ते कोणते ?

कंद०— एक तर ते फार भ्याड आहेत.

इंदि०— कोणत्या गोष्टींत ?

कंद०— पापासंबंधानें. दुसरें असें, कीं ते अगदीं नामर्द आहेत.

इंदि०— मी नाहीं समजलें.

कंद०— परस्त्रियांच्या संबंधांत. तिसरें असें, कीं ते मोठे चोर आहेत.

इंदि०— चोर ?

कंद०— दुसऱ्याचें हृदय हरण करण्यांत मोठे बिलंद चोर !

इंदि०— हें मात्र कांहींसें खरें; पण आपण सांगितले हे तर सारे सद्गुणच आहेत !

( चाल–विनवणि करि सुखनिधान )

ललित बघुनि तनु सकाम । करिति सकल गुण
विराम । पुण्यधाम नरललाम ॥ ध्रु० ॥ कुसुमिं
खचित जणुं तरुवर । उडुविरचित गगन रुचिर ।
चरित तेंवि सुकृतदाम ॥ १ ॥

कंद०— ( एकीकडे ) माझा दुसराही प्रयत्न फसला ! मी मूर्खानें निंदा करायची सोडून तारीफच केली, आणि हिचा ग्रह दृढ मात्र केला. ती पहा नंदनाकडे अधिकच प्रेमानें पाहूं लागली. आणि हें उत्कट प्रेम उत्पन्न होण्याला कारण माझाच मूर्खपणा ! मी त्याच्या हृदयांतून थोडें रक्त काढिलें खरें, पण त्यानें हिचें हृदय अनुरक्त करून सोडिलें ! मला वार करून बेशुद्ध करणारा कोणी भेटणार नाहीं का ? छेः ! येवढें माझें कुठलें भाग्य ! मंदारमहाराजांनीं मजवर तरवार उपसली होती. पण नंदनानें मध्यें पडून ती

बरचेबर सांवरिली. हा नंदन मला जिथें तिथें असाच नडवीत आहे ! ( डोकें धरून बसतो. )

इंदि०— आज आपली प्रकृति नीट दिसत नाहीं.

कंद०— असें तर खरेंच. मघांपासून जो कपाळशूळ उठला आहे तो कांहीं केल्यानें रहात नाहीं.

इंदि०— रेरे ! माझ्या बोलण्यानें तुह्मांला विनाकारण श्रम झाले ! डोकें चेपलें तर बरें वाटेल का ?

कंद०— ( स्वतःशीं ) किती तरी ममताळू हिचें अंतःकरण हें ! अखेरीस माझेंही भाग्य उगवलें ! इंदिरेचा हात माझ्या ललाटीं आहे तर ? ( उघड ) तुह्मांला तसदी होणार नाहीं तर डोकें चेपून घ्यायला माझी हरकत नाहीं.

इंदि०— त्यांत कसली तसदी ! चंडि, थोडेंसें तेल घेऊन ये बरें.

कंद०—( एकीकडे ) अहाहा ! हिच्या स्नेहरसानें आतां माझें डोकें शांत होणार ! ( उघड ) देवा देवा ! काय या डोक्याला प्राणांतिक वेदना होत आहेत तरी !

इंदि०--चंडि, अरे विहंगा, गेलांत तरी कोठें सगळे जण ? ( चंडी व विहंग धांवत येतात ) चंडि, आणिलेंस का तेल ?

विहं०— आणिलें आहे थोडेंसें. बाकीचें सगळें माझ्या पाठीं-तच जिरलें.

इंदि०— चंडि, हें घे तेल, आणि यांच्या डोक्याला लावून तें अंमळ चेप पाहूं.

कंद०— ( एकीकडे ) हरहर ! माझे मनोरथ मृगजलाप्रमाणेंच ठरले तर ! ( चंडी डोकें चेपूं लागते. )

विहं०— ( एकीकडे ) माझी सहधर्मचारिणी नवऱ्याशिवाय इतरांची शुश्रूषा करण्यांत मोठी पटाईत ! नवऱ्याची सेवाही मुळींच करीत नाहीं असें नाहीं. मात्र गांवढळ लोक तिला पायपूजा असें ह्मणतात.

कंद०—( एकीकडे ) सुग्रास अन्न तोंडाजवळून गेलें तें गेलें, आणि वर हा काढेचिराइताचा काढा घ्यावा लागत आहे तो निराळाच ! नंदनाच्या अंगाला त्या सुंदरीच्या हाताचा स्पर्श, आणि माझ्या अंगाला या केंदाशिणीच्या हाताचा ! हातीं आलेल्या अधिका-राचा ही हडळ यथेच्छ उपयोग करीत आहे ! आणखी पांच दहा

पळें जर माझें मस्तक हिच्या पकडींत राहिलें तर तें पार फुटून जाईल. मला विहंगाची मनापासून द्या येते ! ( उघड ) अग आईग ! अरे देवा ! !

चंडी—कां ? व्याधि बळावली वाटतें ?

कंद०— व्याधि तुह्मांला पाहून कुठें पळून गेली याचा पत्ता नांहीं. वेदना होत आहेत त्या तुमच्या रामबाण उपायाच्या.

चंडी— मी रोगांवर नेहमीं जालीम उपायच करीत असतें. पोट दुखलें कीं दे डाग ! कपाळ दुखलें कीं दे डाग !

विहं०— नवरा चुकला कीं दे डाग !

कंद०— एकूण एखादा रोगी तुमच्या संगतीला कांहीं दिवस राहिला तर तो निष्कलंक रहाण्याची फारशी आशा नाहीं ह्मणतां ? त्याचें सगळें अंग डागांनीं देवी आल्याप्रमाणें होऊन जायचें ?

चंडी— एकदां डाग दिला ह्मणजे पुन्हां द्यावा लागतच नाहीं. कारण डागाच्या भीतीनें त्याच्यापासून रोग पळून जातात.

कंद०— माझी व्याधि जर लवकर थांबली नसती तर माझ्यावर सुद्धां डागाचाच प्रयोग झाला असता तर ?

चंडी— होय. पण तो करण्यापूर्वींच आपलें कपाळ राहिलें.

कंद०— आज माझा पुनर्जन्म झाला असें मी समजतों.

चंडी— व्याधींतून बचावलां ह्मणून ना?

कंद०— नाहीं, डागांतून बचावलों ह्मणून!

चंडी— माझी वैद्यकींत फार प्रसिद्धि आहे.

कंद०— माझ्या स्मरणांतूनही आजचा हा प्रसंग जायचा नाहीं. ( चंडी व विहंग जातात. स्वतःशीं ) मी माझ्या हृदय-देवतेला विसरून इंदिरेबद्दल आसक्ति धरूं लागलों त्याअर्थी मला ही योग्यच शिक्षा मिळाली! आतां हें मन अनावर हो-ण्यापूर्वीं येथून पाय काढावा हें बरें. ( उघड ) इंदिराबाई, आपला निरोप घेतों. ( स्वतःशीं ) हिची तर नंदनाच्याच चेहऱ्याकडें सारखी लय लागून गेली आहे. तेव्हां हिच्या समाधीचा भंग न करितां मुकाट्यानें निघून जाऊं या. ( पडदा पडतो. बाहेर येऊन स्वतःशीं ) मीं याप्रमाणें आपल्या मनाचें वरवर कितीही समा-धान केलें तरी माझा येथून पायच निघत नाहीं. माझे पाय लोखंडासारखे होऊन ती चुंबकमूर्ति ते मागेंच ओढीत आहे. माझी इंदिरेवरील ममता ती मोहिनीची बहीण ह्मणून नाहीं हें सिद्ध करण्यास अधिक बलवत्तर प्रमाणें नकोत. या प्रेमबलापुढें माझा टिकाव कसा लागणार? अशा वेळीं या प्रबल ओघास विरोध

न करितां त्याबरोबर वहात जाणेंच शहाणपणाचें होईल. झाला निश्चय ! या सुंदरीचें बळानें किंवा कपटानें हरण करायचें. मग त्याला किती ही श्रम पडोत !

( चाल—कोयलिय कूकें० )

ही हरिन मानी कुमारी । ललिततनु नृपति-
किशोरी । कळि जणुं नव सुकुमारी । तरुजव ठुनि
करिं झडुनि खुडुनि धरिन मग मम या शिरीं ॥
ध्रु० ॥ प्रथम जरि बळें दुखविन बाला । आराधिन
परि तदुपरि तिजला । तदाभिलषित पुरवुनि
वचन वदुनि हृदयहारि ॥ १ ॥

( जातो. पडदा पडतो. )

अंक दुसरा समाप्त.

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

कंदन— ( स्वतःशीं ) पुष्कळ प्रयत्न करून पाहिले. पण माझें हृदयसिंहासन इंदिरेनें आपल्या सावत्र बहिणीपासून बळकाविलें तें कांहीं केल्या तिला परत मिळत नाहीं. माझ्या चित्रपटांवरील मोहिनीच्या चित्रांतील एक एक रेषा अंधुक होत चालली आहे तोंच दुसरीकडे इंदिरेच्या चित्रांतील रेषा नित्यचिंतनामुळें स्पष्ट होत चालल्या आहेत. मोहिनि, मला क्षमा कर. मीं आपणाकडून पराकाष्ठा केली; पण तुझ्या बहिणीच्या मगरमिठीपुढें माझा इलाज चालेना. जुळ्या भावांमधील प्रेमाचा तुला चांगलाच अनुभव आला आहे. दुर्दैवी स्त्रिये, सावत्र बहिणीच्या द्वेषाचाही तुला प्रत्यय यावा असें तुझ्या दैवीं लिहिलेलें दिसतें. हे विचार चालले असतांना तुझी बहीण इंदिरा माझें मन पिळून टाकून तुजकडे विजयानंदाच्या तोऱ्यानें पहात आहे. मोहिनि, तर माझा राग न करितां कींव कर. झालें ! माझ्या हृदयभूमींत मृतवत् झा-

लेल्या माझ्या पूर्वीच्या वल्लभेस या अश्रूंनीं तिलांजलि दिली. आतां त्या भूमींत उदय पावणाऱ्या देवतेस अर्घ्य दिलें पाहिजे. इंदिरेचें मन नंदनावर इतकें बसलें आहे कीं तें उलटविण्याची कोणाचीही प्राज्ञा नाहीं. आतां त्याचे जागीं स्वतःचा प्रवेश करून घेऊन तिच्या प्रेमाचा आस्वाद घेण्याचेंच बाकी राहिलें आहे. त्याकरितां आजारी मनुष्याप्रमाणें दाढीचे केंस मला करावे लागले. काम सुरळीत पार पडावें ह्मणून पिण्याच्या पाण्यांत गुंगीचें औषध घालून मंदारमहाराजांस परिवारासह बेहोष केलें आहे; व नंदनास उचलून आमच्या छावणींत नेण्याचीही व्यवस्था केली आहे. ( पडदा उघडतो. नंदन पलंगावर निजलेला दृष्टीस पडतो. कंदन शीळ फुंकतो; त्याबरोबर कांहीं इसम मेणा घेऊन येतात व त्यांत नंदनास ठेवून उचलून नेतात. कंदन पलंगावर पडतो. ) मोहिनीविषयींच्या माझ्या प्रेमानलाच्या होमांत मी आपल्या नांवाची आहुति देणार होतों; तो आज इंदिरेवरील प्रेमानें प्रेरित होऊन माझें खरें नांव मी धारण करीत आहें. आह्मा पुरुषांच्या चंचलपणाला धिक्कार असो ! मोहिनीचें मजवर आणि इंदिरेचें नंदनावर निःसीम प्रेम आहे. परंतु तेरड्याच्या रंगाप्रमाणें माझ्या प्रेमाचे कसे क्षणोक्षणीं रंग बदलत आहेत. अरे, पण ही पहा इंदिरा आलीच !

इंदिरा ( प्रवेश करून )- ( स्वतःशीं ) ते आजच पहिल्यानें पूर्णपणें सावध झाले. परंतु नंतर लागलीच पुन्हां बेशुद्धि आली ह्मणून मी चंडीला आणि विहंगाला बोलवायला गेलें; पण नोकर वेळेवर उपयोगी पडल्यावर आणखी काय पाहिजे! दोघेंही खुशाल झोंपा घेत आहेत. इतक्या हांका मारिल्या, पण व्यर्थ ! आतां पुन्हा एकदां त्यांच्या प्रकृतीचें मान पहातें, आणि मग जरूर पडल्यास बाबांनाच उठवीन ह्मणजे झालें. ( पाहून ) काय ! पुन्हा शुद्धीवर आले ?

कंद०— ( एकीकडे ) मना, धीर सोडूं नकोस. नाहीं तर सगळा रंग बिघडून जाईल. ( उघड ) मी कुठें आहें ?

इंदि०— महाराज, आपण आपल्याच माणसांत आहांत. आपणांला आतां भीति बाळगण्याचें कारणच नाहीं.

( चाल—सखेरी मैको पियाबिन० )

ग्रहण अजि असुवरिचें सुटलें ॥ ध्रु० ॥ पाश यमाचे वेढुं पहाती । सकल परी तुटले ॥ १ ॥ प्रसन्न पुनरपि मुखाब्ज होवो । भय आतां कुठलें ॥ २ ॥

कंद०— कोण आहे तें ?

इंदि०— मी आपली इंदिरा. मला विसरलांत वाटतें ?

कंद०— मी तुह्मांला कसा विसरेन ? मला एकसारखीं तुमचींच स्वप्नें पडत होतीं. मला एका धिप्पाड यमदूतानें उचलून यमलोकीं–नव्हे स्वर्गलोकीं–नेलें, आणि तेथून तुमच्या रदबदलीनें माझी सुटका झाली.

इंदि०— ( स्वतःशीं ) पहिल्यानें यमलोकाचें नांव घेऊन मागाहून स्वर्गलोकाचें नांव कां बरें घेतलें असावें ? ( उघड ) स्वर्गसुखांतून आपणांला ओढून मृत्युलोकावर आणिल्यामुळें माझ्यावर आपला रोष असेल, नाहीं ?

कंद०— त्या स्वर्गलोकाचा या मृत्युलोकापुढें काय पाड ! सुंदरि,

( चाल–कवणें तुज गांजियलें० )

तव अधरामृतिं अनुपम वसत माधुरी । रस
तैसा पीयूषीं कुठानि सुरपुरीं ॥ ध्रु० ॥ तव
यौवनभरमंथर गमन पाहुनी । इंद्राचा ऐरावत
लाजतो मनीं । पारिजातकुसुमगंध जाइ लोपुनी ।
त्वच्छ्वासामोद जरी मुक्त सुंदरि ॥ १ ॥

इंदि०— ( एकीकडे ) अगबाई ! यांनीं दुखण्यांतून उठल्याबरोबर विषयी भाषणच सुरू केलें. तो पूर्वीचा सभ्यपणा, तें सौजन्य कुठें गेलें ! आजारामुळें स्मरण कदाचित् कमी होईल, बुद्धिभ्रंश होईल; पण याप्रमाणें स्वभाव समूळ बदलून जाऊं नये. ( उघड ) आपणांस आज शृंगारिक विचार सुचत आहेत, तेव्हां आपली प्रकृति बरीच सुधारली ह्मणावयाची !

कंद०— (एकीकडे) हरहर ! माझ्या दुरतिक्रम स्वभावानें उचल खाऊन सारी घाण केली ! ( उघड ) काय ह्मणतां ! मी शृंगारिक भाषण बोलत आहें ह्मणून माझी प्रकृति चांगली आहे ? तुमचें अनुमान निखालस चुकलें ! एखादा पुरुष मद्य पिऊन जर असंबद्ध बरळायला लागला तर तो दोष त्याच्या बुद्धिमांद्याचा कीं मदिरेचा ? येवढा सौंदर्याचा सांठा जवळ असल्यावर तापसी सुद्धां रंगेल बनून जाईल, संसारी मनुष्याची काय कथा ! मग तो आसन्नमरण कां असना ! सुंदरि,

( चाल— न करा मनां खंत )

या मृदुल पर्यंकिं । जरि घेसि शिर अंकिं । कवण
निरयीं पंकिं । न सजे पडाया ॥ १ ॥ करपाश
तव कंठिं । तरि त्या सुखासाठिं । नर कवण न
कंठि । यमपाशपीडा ॥ २ ॥

इंदि०— ( एकीकडे ) यांचा चेहराही दिसावा तितका कृश. आणि फिक्कट दिसत नाहीं. ( उघड ) आज तुमचे गालही वर आल्यासारखे दिसतात !

कंद०— आजारामुळें सूज आली असेल कदाचित् !

इंदि०— डोळेही जरा वर आल्यासारखे दिसतात !

कंद०— तुमचें दर्शन घेण्याकरितां वर आले असतील !

इंदि०— ( एकीकडे ) पुन्हा आली रंगेलपणाची लहर ! ( उघड ) आज केंसांत सुद्धां अंतर दिसतें !

कंद०— माझे केंस त्याच्या केंसाइतकेच आंखूड नाहींत का ?

इंदि०— ( एकीकडे ) त्याच्या ह्मणजे कोणाच्या बरें ? ( उघड ) अगबाई ! तुमच्या डोक्याला सुवासिक तेलही लागलेलें दिसतें.

कंद०— ( एकीकडे ) हरहर ! इची भेट होणार ह्मणून मी मूर्ख शृंगार करून आलों !

इंदि०— आपण येथून कोठें बाहेर गेला नव्हता ना ?

कंद०— नाहीं.

इंदि०— बरें, माझ्या मागें येथें कोणी परकें आलें होतें का ?

कंद०— कोण येणार ?

इंदि०— मग हें तेल कोठून आलें ?

कंद०— तुमच्याबद्दलचा स्नेह आहे हा.

इंदि०— ( स्वगत ) खास येथें कांहीं तरी कपट आहे. (उघड) मी येथें असल्यामुळेंच जर आपली ही स्थिति झाली असेल तर मी बाहेर जातें कशी, आणि बाबांना इकडे पाठवून देतें.

कंद०— हां, तेवढें मात्र करूं नका. तुह्मी येथून गेलांत कीं येथें पूर्ण अंधकार झाला !

इंदि०— मग सांगा तर हें काय गौडबंगाल आहे तें. कंदन महाराज कोठें आहेत ? आणि हें त्यांच्यासारखें सोंग तुह्मीं कां आणिलें आहे ?

कंद०— मी जें सांगणार आहें, तें कुणाला सांगणार नाहीं असें प्रथम वचन द्या.

इंदि०— नाहीं सांगणार.

कंद०— माझ्या हातावर हात द्या.

इंदि०— माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल तर नका सांगूं. पण मी परक्या पुरुषाला स्पर्श करणार नाहीं.

कंद०— आणि तुमच्या पाहुण्यांना करीत होतां तो?

इंदि०— ते कंदनमहाराज म्हणून मी त्यांची शुश्रूषा केली; आणि ते कांहीं मला परके नाहींत.

कंद०— इंदिरे, खरें ना हें ? मग मीच तो कंदन, माझाच तुझ्यावर हक्क आहे.

इंदि०— आणि ते कोण ?

कंद०— तो माझा लुटारू भाऊ नंदन. मीं त्याचें सोंग घेतलें नाहीं. त्यानें मात्र माझें नांव धारण केलें आहे.

इंदि०— बरें, ते आतां आहेत तरी कोठें ? लवकर सांगा; माझा जीव कसा घाबरा होत आहे !

कंद०— इंदिरे, तूं माझी वाग्दत्त वधू असून माझी तुला कींव येत नाहीं; आणि अशा लबाड परक्या पुरुषासाठीं तुझा जीव घाबरा होतो ?

इंदि०— ते मला मुळींच परके नाहींत. त्यांचें भाषण माझ्या मनासारखें, वर्तन मनासारखें, स्वभाव मनासारखा. परके वाटायला त्यांची कोणती गोष्ट माझ्या मनासारखी नाहीं? तुम्ही मात्र मला पदोपदीं परके वाटतां. सांगा सांगा त्यांचें काय केलेंत तें ?

कंद०—तो सुखरूप आहे. आणखी दोन घंटे त्याच्या जिवाला धोका नाहीं. तो तूर्त माझ्या साथीदारांच्या अटकेंत आहे.

इंदि०— तुह्मीच तर ते चोरांचे नाईक ? तुह्मींच त्यांना घायाळ करून मृत्यूच्या दारीं बसविलें ? आणि ते पूर्वीसारखे होऊन आपलें भक्ष्य आपल्या हातांतून जाईल असें पहातांच तुह्मी त्यांना येथून पळवून त्यांचा घात करीत आहांत ? काय पण बंधुप्रेम ! आईच्या उदरांत असतांनाच त्यांची हत्या केली नाहीं हेंच नवल !

कंद०— मी त्याला इजा केली नाहीं. त्यानें मात्र मला लत्ताप्रहार करून आपल्यापुढें आपल्या स्वागताची तयारी करण्याकरितां जगांत पाठवून दिलें. पुढें त्यानेंच राज्यावरील माझ्या हक्काला खो दिला, आणि अखेरीस माझ्या बाळपणच्या मैत्रिणीला बळकाविलें. इंदिरे, या सगळ्या अपराधांबद्दल मीं त्यास क्षमा केली; आणि तुझ्या समागमांत अरण्यवास सुद्धां पत्करिला असता; पण येथें सुद्धां नंदनानें बिब्बा घातला ! खरोखर अशा नराधमांना चिरडूनच टाकिलें पाहिजे !

( चाल–भज रघुवीरश्याम० )

खल वसतिसि योग्य मुळिं न जगतीं ॥ ध्रु० ॥
उरगोपम असती सतत मुखें खरतर विष वमंती
॥ १ ॥ यष्टिताडनाचि उचित खचित त्या । स्थालिं
ज्या ज्या दिसती ॥ २ ॥ प्राणदान त्यां इतर-
हननसम । सुजन न आदरिती ॥ ३ ॥

इंदि०— तुमच्या बंधुंच्या आणि तुमच्या स्वभावांत किती तरी अंतर! ते तापांत बरळत असतांना सुद्धां तुमच्याबर रोष न करण्याबद्धल मला विनवीत होते! आणि तुह्मी चांगले शुद्धीवर असून त्यांचा घात करण्याची इच्छा करितां!

कंद०— ( एकीकडे ) बुडत्याचा पाय खोलांतच. बुडत्यानें पाषाणाचा आश्रय केला ह्मणजे त्याची जी गती तचि माझी झाली आहे. हिच्या वशीकरणार्थ मी ज्या ज्या युक्त्या योजीत आहे त्या सगळ्या मलाच प्रतिकूल होत आहेत. ( उघड ) इंदिरे, पोट भरून ढेकर देतांना कोण नाहीं उदार होत? नंदन - सुखांत लोळत होता. तेथून पडल्या पडल्या माझी कींव करणें त्याला कांहीं कठिण नव्हतें.

इंदि०— तुह्मी अगदीं चुकतां! त्यांचें सगळें आयुष्य प्रेमशून्य होऊन गेलें आहे. असें असल्यावर त्यांना सुख कोठून मिळणार?

कंद०— मोहिनीच्या प्रेमाचा त्याला लाभ होत नाहीं ह्मणून ती उणीव तूं भरून काढणार वाटतें! ठीक ठीक! वहिणीची सवत होऊन तिच्या सुखाच्या आड येण्यांत तूं मोठेंच पुण्य संपादन करणार आहेस!

इंदि०— जुळ्या भावाचा घात करण्यापेक्षां हें पाप खात्रीनें अधिक नाहीं. त्यांनून ताईचें नंदनमहाराजांवर प्रेम असतें तर तुमचें ह्मणणें ठीक होतें. पण जिला मुळीं त्यांच्या प्रेमाची किंमतच नाहीं तिच्या सुखाच्या आड मी कशी येणार?

कंद०— तिचें राज्ञीपद तरी तूं डळमळीत करणार कीं नाहीं?

इंदि०— मला वैभवाची मुळींच हांव नाहीं. मी नंदनमहाराजांची दासी होऊन राहीन; पण तुमची राणी होणें मला नको.

( चाल—भुलवी नरा० )

सुजनासवें वसणें बरवें। जरि वैभवें युत तो
नव्हे ॥ ध्रु० ॥ कुजनीं वसे जरि संपदा। निकटीं
कदा। न तरी वसवे ॥ १ ॥ धरणी क्षमा कुज-
नान्विता। सुजनीं युता। वसुधा मिरवे ॥ २ ॥

कंद०— एकूण मंदारमहाराजांनीं दिलेलें वचन तुझ्या हट्टामुळें मोडण्याचा त्यांना प्रसंग यावा ना ?

इंदि०— मी नंदनमहाराजांची सेवा करीत होतें, ती बाबां च्याच आज्ञेनें; तेव्हां त्यांना यांत वाईट वाटण्यासारखें कांहींच नाहीं.

कंद०— ते नंदनालाच कंदन समजत होते; आणि ह्मणूनच त्यांनीं त्या गोष्टीला रुकार दिला. पण खरा प्रकार कळल्यावर त्यांचें मत बदललेंच पाहिजे.

इंदि०— मला नाहीं वाटत तसें. तुह्मां दोघांमध्यें अंतर दिसूं नये इतकी कांहीं त्यांची दृष्टि अजून मंद झाली नाहीं.

कंद०—पुनः पुनः तें अंतर तूं माझ्यासमोर आणितेस असें तें आहे तरी कोणतें आणि किती ? आह्मी दोघे रूपानें अगदीं सारखे नाहीं का ?

इंदि०— जिची दृष्टि गुणांवर ती आकृतीच्या सारखेपणावर कशी फसणार ? त्या सारखेपणानें उलट गुणांमधील अंतर अधिक चळून मात्र दिसतें.

कंद०— इंदिरे, मीं कसें वागावें हें तूंच मला शिकीव. तुझ्या शिकवणीप्रमाणें मी चाललों नाहीं तर माझा अव्हेर कर. परंतु विनाकारण अशी विन्मुख होऊन माझी आशा समूळ नष्ट करूं नकोस.

( चाल— वाहिं तूंतें )

दावीं पंथा अनुसरें तया अचल भावें अंतरच न
अणु ॥ ध्रु० ॥ प्रेम भूतांवरी। बोधिसी मज जरी।
क्षुद्रजीवार्थ तरि। ही त्यजिन तनु ॥ १ ॥ आ-
त्मसंयमनिं निज। योजिसी जरिहि मज। होइं
शमधन समज। तों शुकचि जणुं ॥ २ ॥

तूं मला सत्याचा उपदेश कर, ह्मणजे सत्यासाठीं मी सर्वस्वावर पाणी सोडण्यालाही तयार आहें असें तुझ्या नजरेला येईल. तूं मला औदार्याचा मंत्र सांग, कीं शत्रूकरितां देखील प्राणांची आहुति देण्याला मी तयार झालों ह्मणून समज.

इंदि०—( एकीकडे ) शत्रूकरितां प्रेमाची आहुति देण्याला मात्र तयार नाहीं।

कंद०—असा सुंदर गुरु मिळाल्यावर कोणता मंदबुद्धि शिष्य तयार होणार नाहीं? माझें तुझ्यावर जें निस्सीम प्रेम आहे त्यानें पशूचा मनुष्य होईल; मग मनुष्याचा देव नाहीं का होणार? नंदनाच्या गुणांची ती काय प्रतिष्ठा? इंदिरे, कृपा कर, मला आपणाजवळून दूर ढकलूं नकोस.

( चाल—पापी दादुरवा० )

पुरी न करीं निराशा । दनुजा कर्कशा । भीषण-
वेशा । घालिल पाशा । कारिल नाशा ॥ ध्रु० ॥
हेतु जगीं आशा जीविता । दीपिकाच तत्पथा ।
ईशेषिता । लोप होय जरि तिचा सर्वथा । हो
दुर्दशा ॥ १ ॥

इंदि०—मला तुह्मांला द्यायला प्रेमच उरलें नाहीं, त्याला मी तरी काय करूं?

( चाल—जरि पदीं मती दृढ झाली. )

मन वरीतसे नृपराया । तत्करीं सकल मम
काया । मन नसे जवळिं मुळिं द्याया ॥ ध्रु० ॥

कंद०—निःसहाया । भूपकन्या । तनुसि अन्या ।
क्षम न द्याया ॥

इंदि०—मम सदय जनक मृदुवचनसुलभ न करि
कधीं हेतु वाया ॥ १ ॥

कंद०—इंदिरे, तुझ्या मीं इतक्या विनवण्या केल्या तरी तुझें अंतःकरण द्रवत नाहीं! तुझें अनुकरण करून मी जर निष्ठुर हृदयाचा बनलों आणि तुला जुलुमानें आपलीशी केली तर तूं काय करशील?

इंदि०—बाबांना हाक मारीन.

कंद०—त्यांना व सेवकांना अमली पाणी पाजल्यामुळें ते सगळे घोरत पडले आहेत. मी जर या एकांतस्थलीं तुझ्या कौमार्यावर घाला घातला तर काय करशील? बोल!

( चाल— मम तनुप्राते कंप० )

क्षणिं लुटिन सुरूपसंपदा ॥ यौवनाढ्या। वेगें
हरितों त्वन्मदा ॥ ध्रु० ॥ तव विभ्रममदिरा मादि-
राक्षि। मत्त करी मज ईश्वर साक्षी। बल साहस
दे विवेक भक्षी। रक्षि दयित गे तव कदा ॥ १ ॥

इंदि०— तुह्मी आपल्या प्रेमबळावर देवपणा मिळविणार होतां, ते अखेर पशुकोटींतच गेलांत! माझ्या निष्कलंक देहाचें

रक्षण करणारें एक पाणीदार शस्त्र नेहमीं मजपाशीं असतें. ( हिरकणी काढिते ) हें पाहिलेंत का तें ? असे घाबरूं नका. या शस्त्रानें दुसऱ्याच्या शरीराला बिलकुल इजा होणार नाहीं. काय तें माझेंच काळीज कांपीत तें आंत जाईल.

कंद०— तुझ्यासारख्या रत्नाचा या हिरकणीनें मृत्यु होणें कितीहि अनुरूप असलें तरी तें मला इष्ट नाहीं. तूं हें जग सोडिलेंस कीं मला चोहोंकडे अंधकार झालाच ह्मणून समज. तूं जरी माझ्या संगतीला कंटाळली असलीस तरी माझी शांति, माझें सौख्य, फार काय, पण माझा प्राण सुद्धां तुझ्या मागोमाग जाईल.

( चाल— राष्ट्रोन्नति अवनति० )

हें जीवित सकल तुझ्या करीं । प्राण तुझा मम
तोंवरी । अंत तुझा तो मम सुंदरि ॥ ध्रु० ॥ रवि-
सम उज्ज्वल तव मुख ज्या लोकीं । राहत वितरी
प्रकाश तयास । जाइ सोडुनी तरि त्या कालीं पडे
महाविभावरी तयावरी ॥ १ ॥

इंदिरे, आतां तुला शेवटचा एकच प्रश्न विचारितों. बलात्कार आणि कपट हीं सोडून मी उजळ माथ्यानें तुझ्या वडिलांस जर

तुझ्याबद्दल मागणी केली आणि ती त्यांनीं जर मान्य केली तर तूं माझा स्वीकार करण्याला कबूल होशील का ?

इंदि०— मी बाबांच्या आज्ञेबाहेर कधींही वागणार नाहीं. पण या गोष्टीला त्यांची संमतिच मिळणार नाहीं.

कंद०— माझें सुख किती जरी असंभवनीय असलें, तरी पण निदान या घटकेस मला तूं थोडीशी आशा ठेविली आहेस, येवढ्यानेंच जिवंत रहाण्याला मला पुष्कळ आधार झाला. देव तुझें कल्याण करो ! ( जाऊं लागतो. )

इंदि०— आणि नंदनमहाराज ?

कंद०— त्याजविषयींचा माझा द्वेष पार मावळून गेला. तुझें ज्या मनुष्यावर प्रेम तो मलाही आवडलाच पाहिजे. इंदिरे, तो थोड्याच अवकाशांत या ठिकाणीं तुझ्या प्रेमदृष्टींत पोहत असलेला दिसून येईल. ( जातो. )

इंदि०— ( स्वगत ) अरेरे ! बिचाऱ्याची मनापासून दया येते. प्रेमामुळें गाईसारखा दीन होऊन गेला आहे ! असें प्रबळ प्रेम त्यांच्या मनांत उद्भवेल तर ? पण तसें कुठून होणार ! जसें कंदनमहाराजांचें प्रेम मला फेडतां येत नाहीं तसें माझें

प्रेमही नंदनमहाराजांना फेडतां येणार नाहीं. प्रेमाच्या पेठेंत दिवाळखोरांचींच दुकानें फार । पण माझ्या प्रेमाची जरी त्यांच्याकडून फेड होण्याची आशा नसली तरी केवळ या एकपक्षीय प्रेमाच्या भावनेनें सुद्धां मला किती तरी सुख होत आहे !

( चाल—खेलत नंदकुमार )

त्यावरिची ममता । भासवी भू वितता । सुखयुता ॥ ध्रु० ॥ लोहीं जैसा । परिस स्पर्शा । करूनी निर्मी कांचनता ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

( नंदन पलंगावर पडला आहे. )

नंद०— ( स्वतःशीं ) मघाशीं मी स्वर्गसुख अनुभवीत होतों, तों एकदम यमपुरींत कसा आलों ? ती दिव्य इंदिरा कोठें आहे ?

तिचे मंजुल शब्द अजून माझ्या कानांत घुमघुमत आहेत. इंदिरे, तुझ्या प्रेमळ शुश्रूषेमुळें माझ्या आजाराचें सार्थक झालें असेंच मी समजतों. अशा शुश्रूषेकरितां नेहमीं आजारी रहावयाला सुद्धां मी तयार आहें. लोक नेहमीं रोगासाठीं औषध घेतात. पण औषधाकरितां रोग पत्करायला लावावा इंदिरेनेंच !

( चाल-संया परो नहि मोरे पंया )

स्वकरिंचे कटु औषध तीचे । मधु मधुचें तरि कारण
कैचें ॥ ध्रु० ॥ देत आग्रहें मन्मुखिं तेव्हां । नच
संपो तें वाटे साचें ॥ १ ॥ श्रासा दे तें त्यासह
लाभे । मधु वच रुचिकर तिच्या मुखींचें ॥ २ ॥

( तडाग दिवा घेऊन येतो. )

नंद०—तुह्मी प्रकाश घेऊन येणारे कोणीही असा. तुमचे मजवर उपकार आहेत.

तडा०—मीं तुमच्यावर उपकार करण्याकरितां हा दिवा आणिला नाहीं. तुमचें डोकें उडवितांना मला नीट दिसावें ह्मणून आणिला आहे.

नंद०— माझें डोकें तुह्मी उडविणार ? आणि तें कां ह्मणून ?

तडा०— मालकाचा हुकूम ह्मणून.

नंद०— तुमचे मालक कोण ?

तडा०— आमचे मालक आतां आहेत नंदनमहाराज.

नंद०— काय ? मीच तुमचा मालक ? आणि मीच मला मारण्याची तुह्मांला आज्ञा केली ? हा काय घोंटाळा आहे ?

तडा०—तुह्मी नंदनमहाराज पूर्वीं होतां, आतां नाहीं.

नंद०—मीं जर बेशुद्धींत आपल्याच वधाचा हुकूम दिला असेल, तर तो बदलून टाकतों.

तडा०—तुह्मी आपले हुकूम वाटेल तसे फिरवाल. पण मी ऐकलें पाहिजे ना ? आधीं आपला पहिला हुकूम मला बजाऊं द्या ; आणि मग जर प्राण राहिला तर तो रद्द करून टाका; माझी कांहीं ना नाहीं. पण आज एक हुकूम कर, उद्यां तो फिरीव, परवां तो क़ायम कर, तेरवां त्याला हरताळ लाव, असा पोरखेळ माझ्यापाशीं नाहीं चालायचा.

नंद०—( एकीकडे ) शुद्ध कसाब आहे ! ( उघड ) पण असे पाषाणहृदयी कां झालांत ?

तडा०—मी जरी पाषाणहृदयी असलों तरी तुमच्या भावा-

पेक्षां आणि बायकोपेक्षां फार बरा! या तरवारीला त्याच्याच हृदयावर धार लाविली आहे.

नंद०—काय? कंदनाची आणि मोहिनीची निंदा माझ्या समोर?

तडा०—हो. माझ्यासारखा शिपाईगडी मागें नाहीं कधीं निंदा करणार.

नंद०—तुमच्या डोक्यांत कोणीं तरी चुकीची कल्पना भरवून दिली आहे. कंदन हा केव्हांच परलोकवासी झाला!

तडा०—मुळींच नाहीं! तुमच्याच डोक्यांत ही चुकीची कल्पना शिरली आहे. पण त्या कल्पनेसकट हें डोकें उतरून ठेवितों, ह्मणजे मग भानगडच रहाणार नाहीं.

नंद०—देवा, मला पोटच्या पोराप्रमाणें वाटणारा माझा पाठचा भाऊ मला जगांतून खो द्यायला पहातो, आणि जी माझी केवळ नांवाची स्त्री असतांही तिचा प्रत्येक शब्द मी आजपर्यंत फुलासारखा झेलला ती माझ्या मानेवर सुरी देते! ही गोष्ट खरी असेल तर मग जगण्यांत काय सौख्य? आणि आप्तच इतके क्रूर झाल्यावर मृत्यूच्या निष्ठुरतेचें भय कोठें राहिलें? मृत्यु केव्हां

तरी येणारच आहे, पण आपल्या जवळच्या आप्ताचा कृतघ्नपणा मात्र अगदीं असंभाव्य आहे! तोही जर संभवूं लागला तर मृत्यू-लाच आपली तयारी कां नसावी? हरहर! हा मर्मभेद मी कसा सहन करूं? ( मूर्छित होतो. )

कंदन ( प्रवेश करून )—तडागा, अर्जुन याच्यावर शस्त्र चालविलें नाहींस ना? ठीक झालें! या वेळीं तुझी सुस्ती माझ्या चांगली उपयोगी पडली. मी इंदिरेकडून निघाल्यावर स्वतःशीं विचार करीत एकांतांत बराच वेळ घालविला. नंतर एकदम आठ-वण होऊन इकडे धांवत आलों. माझ्याकडून आज केवढा तरी प्रमाद होत होता!

तडा०— हा पहा एक घाव आणि दोन तुकडे करून टाकितों.

कंद०— हं, राहूं दे त्याला तसाच. त्याच्या केसालाही धक्का लावूं नकोस.

तडा०— याला मारिलें नाहीं ह्मणून सुस्त ह्मणतां, आणि वर केसालाही धक्का लावण्याची मनाई करितां! ह्मणावें तरी काय तह्मांला!

कंद॰— मला कांहीं ह्मणूं नकोस. अगोदर याला आणिलास त्या वाटेनें इंदिरेकडे पोहोंचता कर.

तडा॰— असें कां बरें ?

कंद॰— इंदिरेची आज्ञा ह्मणून.

तडा॰— मोहिनी राणीसाहेब मार्गे पडल्या वाटतें !

कंद॰— चल आटप लवकर ! ज्यास्त चौकशी करण्याचें तुला कारण नाहीं.

तडा॰— बरें, या खेपेला याला सोडला, पण पुन्हा केव्हां याची मुंडी मुरगाळायची ?

कंद॰— मुंडी मुरगळण्याची गोष्ट जरा बाजूलाच राहूं दे. उलट इतःपर माझ्यासमोर जशी मान लववितोस तशी तुला याच्यापुढें लवविली पाहिजे.

तडा॰— आणि यानें आपणांवर सूड उगडून आपणांस धूळ चारली तर ?

नंद॰— त्यालाही माझी तयारी आहे. आजपर्यंत जे दोष घडले त्यांच्या मानानें हें प्रायश्चित्त कांहींच नाहीं.

तडा०— कोणते बुवा दोष घडले ? एखाद्याला हटकून मारतों असें कबूल करून नंतर कधीं माघार घेतली आहे ? किंवा आईला मारल्यावर तिच्या आवडत्या लेंकराला मागोमाग पाठविलें नाहीं असें तरी कधीं झालें आहे ?

कंद०— अजून तूं अज्ञानांत लोळत आहेस ! माझ्या नेत्रांना आज चांगलें अंजन मिळून दिव्य दृष्टि प्राप्त झाली आहे. मी यापुढें शुद्ध नीतीला अनुसरून वागणार. आजपर्यंत ज्यांचें द्रव्य हरण केलें आहे त्यांना तें परत देणार.

तडा०— वा ! आणि स्वतः भीक मागणार वाटतें ?

कंद०— अन्यायानें मिळविलेल्या लक्ष्मीपेक्षां न्यायाचें दारिद्र्य पुरवलें.

तडा०— आज तर तुह्मीं पुराणिकाचेंच अवसान आणिलें आहे !

कंद०— तूं माझा सेवक असून मला कितीही टाकून बोललास तरी आतां माझी शांत वृत्ति ढळणार नाहीं. तडागा, क्रोध हा मनुष्याचा वैरी आहे.

तडा०— ( एकीकडे ) खास यांना वेड लागलें ! ( उघड )

असें होऊं लागलें तर मला आपला निरोप घ्यावा लागेल. कारण अशा नोकरींत मुळीं रामच नाहीं !

कंद०— सारे निघून जा ! मी एकटा राहीन येथें. इंदिरेच्या प्रसन्नतेशिवाय मला आतां कशाची जरूर राहिली नाहीं. ( तडाग जाऊं लागतो. ) अरे, प्रथम नंदनाला मात्र मीं सांगितल्याप्रमाणें पोहोंचता कर.

तडा०— आज्ञा पाळायची संवयच लागलेली; न करून कसें चालणार ! ( पडदा पडतो. )

कंदन ( बाहेर येऊन )—( स्वतःशीं ) आज इंदिरेनें माझ्यावर प्रथमच विश्वास ठेविला, आणि त्या विश्वासाला मी पात्र आहें असें मीं तिला सिद्ध करून दाखविलें, या विचारानें मला किती तरी समाधान वाटत आहे !

( चाल०—झाली खचिताचि ममही दशा )

होई सुखलव आजि मना । करितां रमणीभय-
शमना ॥ ध्रु० ॥ आत्महितारार्धानें सुख वाटे ।
त्याहुनि परहितसाधनिं मोठें । त्यागाची मज
दीक्षा भेटे । मधुर गुरु श्रम उरावेच ना ॥ १ ॥

मधुरसमागमसुखीं रहावें । रमणीसी सुख सदैव द्यावें । रूपगुण तिचे अंतरिं ध्यावे । आस पुरवि ही श्रीरमणा ॥ २ ॥

इंदिरे, तूं जर माझ्या प्रेमपूर्ण हृदयावर विश्वस्तपणें पडून राहशील तर आजन्म तुला या बाहूंमध्यें फुलासारखी वहाण्यांत मला धन्यता वाटेल. माझी पूर्वींची सर्व महत्त्वाकांक्षा मनांतल्या मनांत जिरून गेली आहे. आतां तुझे नेत्र हाच माझा ध्रुव, तुझें हास्य हेंच माझें यश, तुला प्रसन्न ठेवणें हाच माझा पराक्रम. तुझा स्वामी होण्यास मी पात्र नाहीं, व होण्याचा संभवही कमीच. जर झालों तर माझ्यासारखा भाग्यवान् त्रिभुवनांत सांपडणार नाहीं. नच झालों तर तुझ्या चरणांचा दास होण्यांतच मला संतोष आहे.

[ जातो. पडदा पडतो. ]

अंक तिसरा समाप्त.

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

( मोहिनी, तडाग व पुष्करिणी )

मोहि०— एकूण तुह्मी गेलांत तसे हात हलवीत परत आलांत. तुह्मी मोठे पराक्रमी, शहाणे असें समजून मी तुमच्या भरंवशावर राहिलें. पण तुह्मीं साऱ्या कामाची घाण केलीत !

( चाल०—धरुनिया न मनिं भयासि० )

असुनि अज्ञ बहुत सुज्ञ मिरवितसां । माति न
लवभरि दिसत मजासि । अनुचरी पाडिन न मम
मुळिं फाशीं ।

पुष्क०—परिजानिं उचित न अकरुण निज मन
॥ ध्रु० ॥ अति दारुण घडला दोष तिकडला
घाट बिघडला जो पुढला । परि संमत वडिलां
तरि कृति तडिला नेतिल नडिला वारुनिया ।

मोहि०— कुशलता ये कुणिकडुनि परि आशि ॥ १ ॥

तडा०—मीं काय करावें, राणीसाहेब ? माझ्या मालकांनींच आपला हुकूम फिरविला, त्याला मीं काय करूं ? मी काय हुकुमाचा ताबेदार ! नाहीं थोडेंच ह्मणतां येतें !

मोहि०— त्यांना हातचें जाऊं दिलें तें दिलें, आणि वर तुह्मी त्यांच्याजवळ वाटेल तें बडबडलां असाल !

तडा०— वाटेल तें कसें राणीसाहेब ? मी खोटें बोललों असा जर तुमचा समज असेल तर तो अगदीं चुकीचा आहे. विनाकारण खोटा शब्द या तोंडांतून कधीं निघणार नाहीं.

मोहि०— ( एकीकडे ) मला वाटत होतें कीं या नंदीबैलाला या कारस्थानांत घेतल्यानें असाच कांहीं तरी घोंटाळा होईल. बरें, त्यानें त्यांच्याजवळ काय काय गोष्टी सांगितल्या हें तर पाहूं. ( उघड ) एकूण तुह्मी मोठे सत्यवक्ते आहांत तर ? तरी पण कडू लागणारें सत्य तुह्मी बोलत नसाल.

तडा०— कडू असलें तरी मी नाहीं फिकीर करीत. रोग्याला औषध पाजायचें तें कडू असलें तरी त्याला घट्ट बांधून तें त्याच्या तोंडांत कोंबावेंच लागतें कीं नाहीं ?

मोहि०— पण नंदनमहाराजांपाशीं आमच्यासंबंधानें बोलायला तुह्मांला धीर झाला नसेल ?

तडा०— धीर ? मी कांहीं असा कच्च्या मातीचा घडलेला नाहीं, राणीसाहेब. मी कोणाच्या बापाला भ्यायचा नाहीं. ते जेव्हां मला ह्मणाले कीं असा निर्दयपणा करूं नकोस तेव्हां मीं त्यांना साफ सांगितलें कीं मी आहें हुकमाचा ताबेदार.

मोहि०— आणि तो हुकुम कोणाचा आहे ह्मणून सांगितलें ?

तडा०— राणीसाहेब, मीं अगदीं कृतघ्न ह्मणून समजलांत कीं काय ? मी आपला उभयतांचा ताबेदार ! कंदनमहाराजांनीं मला कनक दिलें, आणि तुह्मी मला कांता देणार !

मोहि०— तुह्मी आमचे ताबेदार असाल ! पण त्यांना तुह्मीं तसें सांगितलें नसेल !

तडा०— कोण लेकाचा ह्मणतो नाहीं ह्मणून ? आणा त्याला माझ्यासमोर. त्याचे कान उपटून हातांत देतों.

मोहि०— ( एकीकडे ) तुझेच कान चांगले उपटले पाहिजेत. फार लांबले आहेत !

तडा०— तुमच्या पायांची ताबेदारी करायची, आणि बोलण्यांत ती नाकबूल करायची, हा कोठला न्याय ? जशी माझी निष्ठा तसेंच माझें बोलणें, आणि तसेंच माझें चालणें !

मोहि०—बरें, या कारस्थानांत माझें अंग आहे असें तुह्मीं त्यांना सांगून सोडून दिलें; तर आतां ते आमचा सूड घेतल्यावांचून रहातील का ?

तडा०— ते पुढें लौकरच सुटणार आहेत हें त्या वेळीं मला काय माहित ? मला वाटलें मरणाऱ्या माणसाला सांगायला काय हरकत ? ह्मणून मी बोलून गेलों. देहांतशिक्षा झालेल्या अपराध्याला मरणापूर्वीं यथेच्छ मिठाई खाऊं घालतात. मींहीं मनांत विचार केला कीं याला सगळी हकीकत सांगून तृप्त करावें.

पुष्क०— तुमची झाली मिठाई ! पण आतां सगळ्यांची खटाई निघेल, त्याचें कसें ?

मोहि०— आतां याला एकच उपाय आहे. तुह्मांला फिरून त्या अरण्यांत गेलें पाहिजे.

तडा०— राणीसाहेब, माफ करा ! मी या कामाला अगदीं कंटाळून गेलों आहें. शिवाय मी मालकसाहेबांचाही शेवटचा निरोप घेऊन निघालों आहें.

मोहि०— असें काय ? तर मग पुष्करणीचाही शेवटचाच निरोप घ्या.

तडा०— असें काय ह्मणतां, राणीसाहेब ? आजपर्यंत माझ्या ताबेदारींत काय कमी पडलें ? आपला प्रत्येक शब्द झेलायला मी एका पायावर तयार होतों.

मोहि०— एकाच कां ? चांगले चार पायांवर तयार होतां असें तुमच्या कृतीवरून दिसून आलें.

तडा०— ह्मणजे माझे दोन आणि पुष्करिणीचे दोन, असेंच कीं नाहीं ?

मोहि०— पुष्करिणीचें नांव आतां सोडून द्या.

तडा०— राणीसाहेब, अशा निष्ठुर नका होऊं.

मोहि०— माझें जर तुह्मांला ऐकायला नको तर तुमचें मी कसें ऐकूं ?

तडा०— ठीक आहे. करा हुकूम. मी तो बजावून आणितों.

पुष्क०— ( एकीकडे तडागास ) शाबास ! माझ्यावर तुमचें प्रेम आहे खरें !

मोहि०— जी चूक तुमच्याकडून झाली आहे ती तुह्मांला निस्तरिली पाहिजे.

तडा०— ह्मणजे मीं काय करायचें ?

मोहि०— तें माझ्या तोंडून कशाला वदवितां ?

तडा०— हं, समजलों ! नंदनमहाराजांना जाऊन सांगायचें कीं या कामांत राणीसाहेबांचें कांहीं अंग नाहीं. असेंच ना ? तें माझें काम !

पुष्क०— ( एकीकडे ) फारच बाई यांचा सरळ स्वभाव !

मोहि०— ( एकीकडे ) अशा मूर्खांशिवाय दुसरा नोकर या कामीं मिळण्यासारखा नाहीं हें केवढें माझें दुर्भाग्य ! ( उघड ) हें पहा, तुह्मीं त्यांना हें सांगितलेंत,आणि त्यांना खरें वाटलें नाहीं तर?

तडा०— खरें कां नाहीं वाटणार ? तुह्मींच मला हें सांगायला सांगितलेंत असें मीं त्यांना सांगितलें ह्मणजे होईल त्यांची खात्री. त्याची नको तुह्मांला काळजी.

पुष्क०— ( एकीकडे तडागास ) अहो, असें वेड्यासारखें काय बोलतां ?

मोहि०— ( एकीकडे ) शर्थ झाली बाई याच्या मूर्खपणाची !

( उघड ) हें पहा, माझ्या नांवाचे तुम्हीं इतके धिंडवडे केलेत ते पुरे नाहीं का झाले ?

तडा०— बरें, तुमचें नांवच नाहीं घेणार. मी त्यांना ह्मणेन कीं माझें पहिलें अंधारकोठडींतलें भाषण जसें तुह्माला खरें वाटलें तसें हें कां वाटूं नये ? दोन्हीं बोलणीं खरीं तरी माना किंवा खोटीं तरी माना.

मोहि०— तुमच्या चुकीची दुरुस्ती न बोलतां झाली पाहिजे. तुमच्या जिभेवर माझा काडीइतका सुद्धां भरंवसा राहिला नाहीं.

तडा०— राहिलें ! खुणांनींच आपला अभिप्राय कळवीन.

मोहि०— तुह्मी खुणांनीं अभिप्राय कळविणार ! ह्मणजे पिशाचाच्या हातांत आयतेंच कोलीत दिल्यासारखें होईल ! मी ह्मणतें, तुह्मांला आपली चूक कृतीनें सुधारली पाहिजे. कंदनमहाराज येण्यापूर्वीं जें काम करण्याच्या विचारांत तुह्मी होतां तेंच तुह्मांला पुरें केलें पाहिजे. शिवाय यांतला एक चकार शब्दही त्यांच्या कानांवर जातां उपयोगी नाहीं.

तडा०— मी आपल्या तोंडाला एक कुलूपच ठोकून टाकितों. बरें, आणखी कांहीं सांगायचें आहे मला ?

मोहि०— जातांना इंदिरेकरितां मी देईन तो खाऊ घेऊन जा.

तडा०— बरें, ( पुष्करिणीकडे बोट दाखवून ) हा खाऊ घेऊन जाऊं का ?

मोहि०— काम फत्ते होईपर्यंत तो नाहीं मिळणार. मी पुष्करिणीला जामीन ह्मणून ठेवून घेणार.

तडा०— बरें बुवा ! तुमची मर्जी !

( पुष्करिणी व तडाग जातात. )

मोहि०— ( स्वतःशीं ) विष घातलेला खाऊ इंदिरा खाणार, तरवारीचें पाणी तिचा वल्लभ पिणार, आणि मृत्यु 'तृप्त होऊन ढेकर देणार ! पण असें करण्यावांचून गत्यंतर नाहीं. आमच्या कटाचा बोभाटा त्यांच्या कानांवर गेलेला आहे. तीं जर नगरास येऊं दिलीं तर माझी मुळींच धडगत नाहीं. ( जाते. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

(नंदन व इंदिरा)

इंदि०— महाराज, आपणांला थोडासा व्यायाम मिळून मोकळी हवा मिळावी ह्मणून मीं बाबांच्या आज्ञेनें आपणांला या टेंकडीवर आणिलें खरें, पण मला वाटतें आपणांला त्यामुळें फारच श्रम झाले.

(चाल–छिनत नाहीं०)

घर्मबिंदुमाला । शोभतसे भाला ॥ ध्रु० ॥ बसतां
गिरिसिंहासनीं । सुरगण कीं आदरुनी । अर्पि
किरीटाला ॥ १ ॥

नंद०— इंदिरे, श्रम केल्याशिवाय हा अनिर्वचनीय आनंद कुठून प्राप्त होणार ? ज्याप्रमाणें बाह्य सृष्टीवर अंमल बसवायला आपणांस आत्मोन्नति करून घेतली पाहिजे त्याप्रमाणें हा विशाल देखावा दृष्टीच्या टापूंत आणण्यास आपणांस चढण्याचा त्रास सोसावा लागणारच. या टेंकडीच्या पायथ्यापासून शिखरापर्यंत

चढत जाणें हें एका दृष्टीनें मनुष्याच्या संसारयात्रेप्रमाणेंच आहे. बाळपणीं ताजा दम आणि संकुचित दृष्टि असल्यामुळें बालक उतावळीनें वर धांवत असतें. पुढें कांहीं मार्गक्रमण केल्यावर त्याचा उत्साह कमी होऊन त्याला एका सोबतिणीचा आश्रय घ्यावा लागतो. पुढें जों जों वय प्रौढ होत जातें तों तों त्याचा अनुभव विस्तृत पण गति सावकाश आणि विचारपूर्वक होऊं लागते.

( खमाज–गजल. )

बाल असतां उन्नतीचा मार्ग पाहे सर्वदा । वृद्ध
होतां अवनतीची भीति वाहे तापदा ॥ तरुण
करुणापूर्ण जेंवी शैलपादीं जल सदा । द्रव दयेचा
वृद्धहृदयीं आढळेना परि कदा ॥ शृंगिं राहे नर
अधोदृक् न परि वरितां गिरिपदा । जरठतरुणीं
भिन्नता ही दिसत आश्चर्यप्रदा ॥ शिखरिं दृष्टि
भ्रमुनि वातें भ्रंशमिष ये आपदा । जारितनेत्रीं मां-
द्य रोगें पतन तनुलागीं तदा ॥

आपण या टेंकडीच्या जवळ जवळ माथ्याशीं ह्मणजे आयुष्याच्या अंताशींच येऊन पोहोंचलों.

इंदि०— (एकीकडे) टेंकडीचा प्रवास जसा याच्या समागमांत झाला तसा संसारयात्रेचा होणें माझ्या नशीबीं असेल का ? (उघड) आपण ह्मणतां तें बरोबर आहे; कारण याच्या पुढची पायरी ह्मणजे स्वर्गलोकच !

(चाल–बताये जाये जानिया)

भवाद्रिशृंग साचें । वार्द्धक्य कीं नराचें ॥ ध्रु० ॥
भविंचा भव्य पसारा सगळा आवरुनी । मन
एकाग्र करी शांति तो स्वयें वरुनी । निकट
ईशा करितसे स्तवुनी । जरितता । भोगितां ।
मुक्तता रुचे ॥ १ ॥

—पण महाराज, आतां टेंकडीवरून उतरण्याचे श्रम आपणाला होतील का ?

नंद०—इंदिरे, ज्याप्रमाणें आत्मोन्नतीपेक्षां अवनति सुलभ त्याप्रमाणें चढण्यापेक्षां उतरण्याचे श्रम फार कमी. त्यांतून आपणाला परत जातांना श्रम होऊं नयेत ह्मणून हा वारा पाहिलास का कसा थंडगार आणि जोरानें वहात आहे ? त्यांत निर्झरांची शीतलता, पुष्पवृक्षांचा सुगंध, फळझाडांचें माधुर्य व कीचकतरूंची कर्णमनो-

हरता एकवटलेलीं असल्यामुळें नेत्रांशिवाय इतर सारीं इंद्रियें त्याच्या स्पर्शानें एकदम तृप्त होऊन जात आहेत.

इंदि०— आपण ज्या वाटेनें आलों तिचे निरनिराळे भाग अंतरामुळें एकमेकांस चिकटलेले वाटून ती वाट आहे त्यापेक्षां फार कठिण वाटत आहे. येथून त्या वाटेंतील झाडांकडे पाहिलें ह्मणजे खरोखरच पायथ्याचीं झाडें मुलांसारखीं ठेंगणीं आणि त्यावरचीं झाडें त्यांपेक्षां मोठमोठीं होत गेलेलीं दिसत आहेत.

नंद०—हीं माथ्यावरचीं झाडेंही वाऱ्याच्या सोसाट्यामुळें जरठांप्रमाणें अगदीं वांकून गेलीं आहेत. इंदिरे, ज्या मनुष्याला आपल्या आयुष्पथाचें सिंहावलोकन करितांना आपल्या सांप्रतच्याप्रमाणें आनंदातिशय होतो तो फारच सुखी ह्मटला पाहिजे.

इंदि०—आपलें झोंपडें कोणत्या दिशेला आहे हें येथून मुळींच सांगतां येणार नाहीं.

नंद०—विशाल वस्तूंशीं प्रसंग पडला ह्मणजे मन असेंच गोंधळून जायचें ! अनंत तारकांनीं खचलेल्या आकाशांत ज्याप्रमाणें एखादा अंधुक तारा हुडकणें कठिण, ज्याप्रमाणें अपरंपार उदकाच्या महोदधींत रत्न हरवलें असतां तें पुन्हां सांपडणें दुर्घट किंवा परमात्म्यांत जीवात्म्याचा विलय झाल्यावर तो वेगळा दिसणें जसें अशक्य

तसेंच या वृक्षांच्या समुदायांत आपल्या झोंपडीचें स्थान शोधून काढणें हें मनुष्याच्या सामर्थ्यापलीकडचें काम आहे. असो, आतां शिल्लक राहिलेला चढावयाचा थोडा भाग आटपून टाकूं. हें पहा, आपल्या प्रत्येक पावलास आपणाला या जगद्रूपी भोंवऱ्याचा नवा नवा क्षितिजरूपी कंगोरा दृष्टीस पडत आहे.

इंदि०—जणुं काय भूमातेच्या कडेवरून खांद्यावर चढणाऱ्यां तिच्या बालकांना तिच्या पदरावरील एक एक सुरकुतीच दिसत आहे !

नंद०—किंवा या टेंकडीच्या आवर्तांभोंवतालचा एक एक तरंगच दृग्गोचर होत आहे ! खरोखर अशा भोंवऱ्यात उभा राहिलेल्या मनुष्यास पुष्कळदां घेरी येते हें ठीकच आहे.

इंदि०—मला सुद्धां भोंवळ येऊन मी खालीं पडतें कीं काय असें वाटतें. मी येथून पडलें तर माझे एका क्षणांत तुकडे तुकडे होऊन जातील नाहीं ?

नंद०—आणि तुझ्याबरोबर तुझ्या आप्तांच्या हृदयांचे.

इंदि०— या असंख्य पानांवर सूर्य तळपत असल्यामुळें त्यानें पृथ्वीला बुट्टेदार शालूच नेसविला आहे असें वाटतें.

नंद०— आणि झाडांच्यीं सावल्या त्या शालूवरील चुण्यांप्रमाणें शोभत आहेत.

इंदि०— या सावल्या सूर्यनारायणाच्या वैरिणी आहेत. सकाळीं पश्चिमेच्या बाजूला होत्या, त्या संध्याकाळीं पूर्वेस होऊन त्याच्याशीं विरोध करीत आहेत. कांहीं वेळानें त्यांचा विस्तार वाढत जाऊन चोहोंकडे त्यांचेंच साम्राज्य होईल, व सूर्याला अज्ञातवासांत रहावें लागेल.

मंदार

नंद०— ( एकीकडे ) नंदनमहाराजांच्या कन्येला हा विचार किती शोभतो पण !

इंदि०—महाराज, आपण जर असेच वर जातां जातां फारच उंच गेलों तर आपणांला पृथ्वीचा अर्धा भाग दिसेल नाहीं ?

नंद०— अतिसूक्ष्म दृष्टि असती तर दिसला असता इतकेंच नाहीं, तर त्यावरील शहरें, नद्या, समुद्र आपणांस बोटानें नकाशावर दाखवितां येतात त्याप्रमाणें दाखवितांही आलीं असतीं. इंदिरे, काळ आणि दिशा हीं जुळीं भावंडें आहेत असें वाटतें. कारण जों जों दिशांचा विस्तार आपल्या नजरेस पडत जातो तों तों गत कालाचींही सर्व पटलें आपल्या कल्पनेसमोर मोकळीं होऊं लाग-

तात. ह्मणजे भूगोल आणि इतिहास दोन्ही एकामागून एक आ-पल्या प्रत्ययाला येऊं लागतात. आपण उभीं आहोंत याच अरण्यांत हजारों वर्षांपूर्वी अनेक महात्मे ऋषि पर्णकुटिका बांधून रहात असतील. याच वृक्षांना त्यांनीं आपल्या हातांनीं लावून पुत्रांप्रमाणें पोसलें असेल. ज्या ठिकाणीं हल्लीं इतकी शांतता आहे त्या ठिकाणीं पूर्वी वेदमंत्रांचा घोष चालत असेल; येथें सुंदर गाईंचे कळप निःशंकपणें नांदत असतील; आपल्या डोक्यावरील हें आकाश होमधूम्रानें धुरकटत असेल; फार काय, पण आपण हल्लीं ज्या शिखरावर उभीं आहोंत त्यावर पूर्वीचे ऋषि उभे राहून मावळणाऱ्या सूर्यनारायणाला अर्घ्यप्रदान करीत असतील. ते ऋषि, ते वेदघोष, ते होम, ते कळप, तें संध्यावंदन, सारांश, तें साधें, निर्मळ, निरुपद्रवी, पुण्यमय जग कोठें गेलें ? ज्या काळाच्या उदरांतून तें निर्माण झालें त्यानेंच तें भक्षून टाकिलें !

इंदि०— आपण इतिहासाची गोष्ट काढिलीत तिच्यावरून मला आपल्या आयुष्याचा पूर्व इतिहास आणि आपल्या प्रवासाचें कारण कळण्याची इच्छा झाली आहे.

नंद०— तूं मजवर इतके उपकार केले आहेस कीं यापुढें तुला अज्ञानांत ठेवणें निव्वळ कृतघ्नपणा होणार आहे. माझ्या चरित्रां-

तील मुख्य भाग तर तुला यापूर्वींच कळून चुकला असेल. कारण मीं आपलें रूप लपविण्याकरितां जी दाढीची योजना केली होती ती आजारामुळें सपशेल फसून गेली. बाकीचा भाग सांगण्यापूर्वीं तुला एक प्रश्न विचारला पाहिजे. तुझें मजविषयीं जें प्रेम आहे तें अगदीं बहिणीच्या प्रेमाप्रमाणेंच शुद्ध आहेना ? मी दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या प्रेमाला पात्र नाहीं हें मी जाणून आहें. शिवाय तूं माझी दुखण्यांत जी बहिणीप्रमाणें शुश्रूषा केलीस तिनें या प्रश्नाचें उत्तर दिलेंच आहे.

इंदि०— मग माझ्याच तोंडांतून कशाला काढितां ? त्यांतून मला बहिणीच्या प्रेमाचा अनुभव आपल्या कल्पनेहून जरा निराळा आला आहे. ह्मणून माझ्या प्रेमाची आपण त्या प्रेमाशीं तुलना करूं नये अशी विनंति आहे.

नंद०— मीं नकळत तुझें मन दुखविलें याबद्दल क्षमा कर. असो; माझ्या प्रश्नाचें मला तुजकडून उत्तर मिळालें. आतां माझें चरित्र तुला संक्षिपानें सांगतों. माझें नांव, माझें स्त्रीबद्दलचें औदासीन्य आणि कंदनाचें देशांतर हीं तुला ऐकून माहित आहेतच. परंतु माझ्याशिवाय इतरांस माहित नाहीं ती गोष्ट हीच कीं मी व माझी स्त्री पतिपत्नी केवळ नांवाला मात्र आहोंत. मनुष्याच्या दृष्टीनें जरी

आह्मी तशीं असलों तरी ईश्वराच्या दृष्टीनें आह्मी बहीणभावंडेंच आहोंत.

इंदि०— काय तरी बाई चमत्कार !

नंद०— गेल्या दहा वर्षांत कंदनाकडून कांहींच वार्ता कळली नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं अचानक त्याचें एक पत्र आलें. त्यांत त्यानें आपला आत्महत्या करण्याचा निश्चय कळविलेला असून तें पत्र आत्महत्या करण्यापूर्वीं त्यानें घाईघाईनें खरडलेलें दिसलें. तुह्मांवरील संकटाची वार्ता यापूर्वींच माझ्या कानांवर आलेली असल्यामुळें, तुह्मला राजधानीला नेऊन कंदनाच्या नांवाचें निराळें ठेविलेलें अर्धें राज्य त्याच्या वाग्दत्त वधूस अर्पण करण्याचा बेत करून मी निघालों. पण तुह्मांला तिकडे नेण्याऐवजीं मीच येथें गुंतून राहिलों.

इंदि०—( एकीकडे ) मना, असें घाबरें होऊं नकोस. (उघड) खरेंच ! या आजारानें आपला किती तरी अमोल वेळ घेतला.

नंद०—आजारापूर्वींच मी येथें गुंतून पडलों होतों. इंदिरे, तुझें मजवरील प्रेम भगिनीप्रेमाप्रमाणें शुद्ध आहे कीं नाहीं हा प्रश्न करण्याचें कारण आतां तुझ्या ध्यानांत येईल. तें कारण हेंच कीं—हंसूं

नकोस—तुला पाहिल्याबरोबर तुझ्या रूपानें आणि शीलानें माझ्या निष्प्रेम अंतःकरणाची तळमळ शांत केली.

इंदि०— ( एकीकडे ) मग पुढची मजल न गांठण्याचें कारण काय असावें बरें ?

नंद०— तुझ्यासारखी सहचारिणी मिळवून जीवितयात्रा सुख-कर करून घ्यावी असाही स्वार्थपर विचार क्षणभर माझ्या मनांत आला; पण तो विचार मला जागच्या जागींच दाबून टाकावा लागला. कारण मनाच्या तशा स्थितींत जर मीं तुजब-द्दल तुझ्या वडिलांना मागणी केली असती तर कंदनाच्या मृत्यूच्या वार्तेचा त्या मागणीशीं संबंध जोडण्यांत येऊन माझ्या शीलाबद्दल एक क्षणभर तरी संशय उत्पन्न झाला असता. आणि शीलाचें रक्षण करणें हें मी आपलें पहिलें कर्तव्य समजतों.

( चाल— चतुर सुगर बैंया )

विमल शील भासे भविं नौका । उतरे करुनि
यदवलंब झणि मुमुक्षुजन अपार संसार ॥ ध्रु० ॥
स्तंभ सुदृढ चरित गमत यदुपरि विश्व वसे अवि-
लोल असें । स्थिति वितरित वस्तुलागिं नसतें
जरि तें धरितें तग जग मग सगळें कैसें ॥ १ ॥

शिवाय जोंपर्यंत एक विवाहित स्त्री नांदत आहे तोंपर्यंत दुसरी पत्नी न करण्याचा माझा निश्चय होऊन चुकला आहे. ती शुद्धाचरण करीत असतांना मीं स्वैर वर्तन करणें अक्षम्य होईल.

इंदि०— ज्या पृथ्वीच्या पाठीवर अशीं सद्गुणी पुरुषरत्नें आहेत ती धन्य, त्रिवार धन्य ह्मटली पाहिजे ! ( उघड ) बरें, ती मरणाची वार्ता तरी खरी आहे का ?

नंद०— खरी नसावी; व यामुळें माझ्या बंधूच्या वाग्दत्त वधूबद्दल मागणी न करण्याला आणखी एक सबळ कारण झालें. वार्ता खरी न मानण्याला कारण विचारशील तर मला पडलेल्या एका भयंकर स्वप्नाशिवाय दुसरें देतां येणार नाहीं.

इंदि०— असें चमत्कारिक स्वप्न तरी कोणतें ?

नंद०— मला वाटलें कीं मी एका अंधारकोठडींत पडलों आहें. तोंच तेथें एक धिप्पाड पुरुष दिवा घेऊन आला; आणि मला ठार मारण्याला तयार झाला. मी तसें करण्याचें कारण विचारितां त्यानें कंदन आणि मोहिनी यांच्या हुकमानें वध करीत आहें असें सांगितलें. त्यानंतर मला दुःखानें मूर्छा आली. सावध होऊन पहातों तों तूं जवळ बसलेली !

इंदि०— ( एकीकडे ) इंदिरे, तूं मोठ्या भाग्याची कीं यांचा पुनर्जन्म होऊन हे तुझ्या पुन्हां दृष्टीस पडले!

नंद०— हें सारें स्वप्नच होतें; पण इतकें स्पष्ट होतें कीं त्याच्या मानानें जागृतावस्थाही अंधुक वाटेल. कंदनाच्या पत्राचा अनुभव त्याच्या स्पष्टतेमुळें जर खरा मानावा तर त्याच्या मृत्यूशीं विरोधि असें त्या घिप्पाड पुरुषाचें भाषण तितकेंच स्पष्ट असल्यामुळें खरें मानिलेंच पाहिजे.

इंदि०— एकूण ती वार्ता खरी ठरो किंवा खोटी ठरो, आपण आपल्या पत्नीचा संतोष राखावयाकरितां आजन्म ब्रह्मचारी, विधुर किंवा संन्यस्त होऊन रहाणार ?

नंद०— मला या संन्यासाची इतकी संवय झाली आहे कीं त्यांत मला अवघड असें कांहींच वाटत नाहीं.

( चाल—सच्चिदानंद गुरु० )

त्याग वाटे सुलभ मोहसुलभा मना। दीर्घ अभ्यास
जरि साध्य नच त्याविना ॥ ध्रु० ॥ कण नदी तटिं
वितरि सुप्रसन्नाच तरि। प्रावृषीं दान करि।
स्मित शरदिं नभ पुन्हां ॥ १ ॥

इंदि०— हें सारें स्वतःच्या दृष्टीनें ठीक झालें. पण दुसऱ्यांची काय वाट ?

( बागेसरी—झंपा )

सेव्य संसार हा स्वजनमतिरंजना । विषयसुखला-
लसा हृदयिं जरि राहिना ॥ ध्रु० ॥ पौत्रमुखद-
र्शनीं । कामना जनकमनिं । युवराजपदनालिनिं ।
शिर धराया जनां ॥ १ ॥

नंदन— माझ्या विरक्ततेमुळें मला एकट्याला दुःख भोगावें लागेल तेवढेंच काय तें. दुसऱ्यांना तिचा उपसर्ग मुळींच पोहोंचणार नाहीं. कंदन पितरांची व प्रजेची इच्छा पूर्ण करण्याला समर्थ आहेच. या पृथ्वीच्या पाठीवर जें एक हृदय सुखांत पहाण्याची माझी हौस त्याही हृदयावर माझ्या विरक्ततेचा कांहीं अनिष्ट परिणाम होणार नाहीं. कारण ईशकृपेनें तो हृदयदुर्ग अजून माझ्यासंबंधानें पुरा अभेद्य आहे.

इंदि०— अरे देवा ! ( डोळे मिटते )

नंद०— इंदिरे, काय झालें तुला ? सावध आहेस ना ?

इंदि०— एकदम काळजाशीं कसेंसेंच झालें !

नंद०— आतां बरें वाटतें का ? का झऱ्याचें पाणी घेऊन येऊं ?

इंदि०— नका नका ! तुह्मीं नका माझ्यासाठीं इतके श्रम घेऊं. मला आपोआप बरें वाटेल. ( एकीकडे ) ज्या प्रेमवृक्षाला प्रेमजलाची जरूर त्याजवर झऱ्याचें पाणी शिंपून काय होणार !

नंद०— माझ्या प्रकृतीला आराम पडावा ह्मणून तूं मला येथें घेऊन आलीस, आणि स्वतःच व्याधि जडवून घेतलीस.

इंदि०— ( एकीकडे ) हो, हा हृद्रोग जडला खराच !

नंद०— काय ? तुझ्या मुखांतून एक अक्षर सुद्धां निघत नाहीं इतकी तूं थकली आहेस ? मी तुला या बाहूंनीं उचलून नेऊं का ? अगदीं फुलासारखी नेतों.

इंदि०— इतके आयास नकोत ! कारण त्यानें आपल्या शीलाला थोडा तरी बाध यायचा. ( चालूं लागते. )

नंद०— निदान हाताचा टेंका घेण्याला कांहीं हरकत नाहीं.

इंदि०—नकोच पण ! उन्नतीपेक्षां अवनति सोपी असें आपणच ना ह्मणालांत ? शिवाय पायथ्याशीं एकदम जायचें झालें तर मला उडी नाहीं का घेतां येणार ?

नंद०—मंदारमहाराजांनीं मला जसें तुझ्या स्वाधीन केलें आहे तसें तुलाही माझ्या हवालीं केलें आहे; आणि ह्मणून तुला घरीं

सुखरूप पोहोंचविणें माझें काम आहे. हा तुझा हात घट्ट धरितों, तो घरीं जाईपर्यंत सोडीत नाहीं. ( इंदिरेचा हात धरितो. )

इंदि०—( एकीकडे ) ईश्वर करो आणि तो जन्मभर न सुटो!

नंद०—( एकीकडे ) श्रमापेक्षां चित्तक्षोभानेंच हिची अशी स्थिति झाली आहे खास!

( चाल–ऐसिहालो० )

आवेगें हालत मूर्ति । समीरणें जणुं लतिका ती ॥ ध्रु० ॥
करतंतु स्फुरण करी हा नासाकलिकाग्रही । स्तबकोपम
उँर थरथरतचि राही । अधरदलातें नच शांति ॥ १ ॥

( जातात )

---

## प्रवेश ३ रा.

—०—

( मंदार व कंदन )

मंदा०—आज बरेच दिवसांत तुमची गांठ पडली नाहीं. मला वाटलें कीं तुह्मी आमचा शेजार सोडून गेलांत.

कंद०—या खेपेस मी आपणांस बरेच दिवसांत भेटलों नाहीं, याचें कारण इतकेंच कीं मी आपणांशीं एकांत मिळण्याची संधि पहात होतों.

मंदा०—एकांत मिळण्याची संधि ?

कंद०—हो, आपणांला एक आपल्याच हिताची गोष्ट कळवायची होती. शेवटीं आज आपले पाहुणे आणि मुलगी बाहेर फिरायला गेलीं असें पाहून मी आलों आहें.

मंदा०— इतकी गुप्त गोष्ट तरी कोणती ?

कंद०— आपले पाहुणे व इंदिरा केव्हां परत येतील याचा नेम नाहीं; तेव्हां पाल्हाळ न लावतां थोडक्यांत सांगतों. माझा एक मित्र आहे. त्याचें बसलें आहे इंदिरेवर अत्यंत प्रेम. तसेंच आपलें राज्य आपणांला परत मिळवून देण्याचें त्याचे अंगीं सामर्थ्यही आहे. इंदिरेच्या प्राप्तीचा संभव असेल तर तिच्या वडिलांचें राज्य परत मिळविण्याच्या कामीं तो आपलें सर्वस्व गमावण्याला तयार आहे.

मंदा०— इतक्या उदार मनाचा पुरुष तरी कोण आहे कळूं द्या.

कंद०—आपणांस त्याची विनंति मान्य आहे हें कळण्यापूर्वींच नांव सांगण्यांत काय तात्पर्य ?

मंदा०—मान्य करण्याला फारशी हरकत नाहीं ह्मणा. पण-पण-

कंद०— तिला कंदनाला देण्याचें जें वचन गेलें आहे त्याची हरकत असेल ?

मंदा०—तुह्मांला आमच्या घरगुती भानगडींची बरीच माहिती दिसते ?

कंद०— आपण समजतां घरगुती ! पण बड्या लोकांच्या खाजगी गोष्टी ह्मणजे साऱ्या जगाची मालमत्ता. वाटेल त्यानें फावल्या वेळीं त्यांची चर्चा करीत बसावें. अमक्या राजानें आपल्या मुलीचें लग्न तिच्या इच्छेविरुद्ध तमक्या राजपुत्राशीं लाविलें, तमक्या राजानें—

मंदा०—जाऊं द्या कीं त्या गोष्टी मुद्याच्या गोष्टीसंबंधानें बोलूं या.

कंद०— बरें तर. कंदनासंबंधानें गेलेल्या वचनाकडून हरकत येईल अशी आपणांला भीति असेल तर ती निराधार आहे. कारण कंदनाचा गेलीं दहा वर्षें कोठेंही पत्ता नाहीं. तो जिवंत आहे कीं मेला आहे हें तरी कोणाला ठाऊक !

मंदा०—जिवंत आहे इतकेंच नाहीं, तर आपणांपासून एका

हांकेच्या अंतरावर आहे; आणि एका घटकेंत तो आपणांपुढेंही उभा राहील.

कंद०—ह्मणजे ? तो पाहुणा कंदनच कीं काय? ( मंदार मान हलवितो. ) अरेरे ! मग माझ्या मित्राला कांहींच आशा उरली नाहीं ? हें ऐकून बिचाऱ्याचा प्राण जाईल !

मंदा०—असें झालें तर मलाही वाईट वाटेल. पण त्याला माझा इलाज नाहीं; कारण आमच्या कुळांत आजपर्यंत सगळे राजे सत्यप्रतिज्ञ होत आले आहेत. बाकी या पेंचांतून—

कंद०—बरें समजा, कंदनानेंच आपली हरकत काढून घेतली; तर मग ?

मंदा०—मग मी आनंदानें इंदिरा तुमच्या मित्रास अर्पण करीन.

कंद०—इंदिरेची या गोष्टीला प्रतिकूलता असली तरी ?

मंदा०—पोरांची कसली घेऊन बसलां आहांत अनुकूलता आणि प्रतिकूलता ? त्यांतून आमची इंदिरा फार गरिब पोर आहे. मीं तिला कंदनाच्या आजारांत त्याची शुश्रूषा करायला सांगितली होती. ती तिनें किती तरी प्रेमानें आणि भक्तीनें केली ! पुन्हां तिला मीं सांगितलें कीं तुमच्या मित्रावर प्रेम कर, कीं तिनें

आपल्या प्रेमाचा मोहरा फिरविलाच ह्मणून समजा. अहो, लहानपणीं मन वळवावें तसें वळतें.

कंद०—एकूण तिच्या इच्छेकडे पहाण्याची जरूर नाहीं ह्मणतां?

मंदा०— आह्मी जें करणार तें थोडेंच तिच्या वाइटाकरितां करणार आहोंत ! आपण आपल्या बुद्धीनें मुलीला चांगला वर पाहून द्यावा. इतक्याउप्पर तिला सुख मिळणें न मिळणें तिच्या हुशारीवर आहे. माझ्या वडील मुलीला कसा सोन्यासारखा नवरा पाहून दिला होता; पण त्यांचें नीटसें जमत नाहीं असें ऐकितों. अहो, प्रेम हें मुलीनें अभ्यासानें वाढविलें पाहिजे. नवऱ्याच्या सुखाची काळजी बाळगून, त्याची टापटीप चांगली ठेवून, एखादे वेळीं त्याजकडे पहातांना गालांतल्या गालांत हंसून तिनें प्रेमाची मशागत केली पाहिजे. इतर वस्तूंच्या वाढीला जर प्रयत्न लागतो तर प्रेमाच्या वाढीलाच कां लागूं नये ?

कंद०— ( एकीकडे ) ह्मातारा अगदीं रंगांत आला आहे ! कां नाहीं येणार ? हा त्याचा आवडता विषय, आणि या विषयांतील हा त्याचा आवडता दुराग्रह. दुराग्रहाच्या पालथ्या घागरीवर अनुभवाच्या पाण्याचा कितीही वर्षाव केला तरी फुकट !

मंदा०— कंदनाकडून जर कांहीं हरकत नसेल तर इंदिरेच्या इच्छेची मी फारशी पर्वा करणार नाहीं.

कंद०— आणि तो माझा मित्र खुद्द कंदनच असला तर ?

मंदा०— मग संशयाचें कारणच नाहीं. अस्सें अस्सें ! तुह्मीं त्या दिवशीं कंदनाला जो अपकार केलात त्याची भरपाई या उपकाराच्या रूपानें करण्याचा तुमचा विचार दिसतो ?

कंद०— महाराज, मी कांहीं इतका उदार नाहीं.

मंदा०— आपल्याच तोंडानें कोण तें कबूल करणार आहे ! बरें, तुह्मीं काय ह्मणालांत कीं तुमच्या मित्रामध्यें राज्य परत मिळवून देण्याचें सामर्थ्य आहे ? पण कंदनांत तर तें कांहीं दिसत नाहीं. मनोराज्यांतला एखादा प्रांत मला दान करणार असल्यास नकळे !

कंद०— अहो, तुमचें राज्य जर कंदनानेंच हरण केलें तर तें त्याला परत करण्याला जड का जाणार आहे ? जो मिळवितो तो वाटेल तसा खर्च करण्यास मुखत्यार आहेच.

मंदा०—तुह्मी खास शुद्धीवर नाहीं. काय ह्मणतां ? कंदन आणि भिल्लांचा राजा इंद्रजाल हीं दोन्हीं नांवें एकाच पुरुषाचीं ?

कंद०— त्याबद्दल मी तुमची खात्री करून देईन.

मंदा०— हें ऐकून माझ्या मनांत अनेक भावनांचें एकच काहूर उठलें आहे. कंदन या क्षणास येथें नाहीं ह्मणून बरें आहे.

नाहीं तर मीं त्याला प्रेमानें मिठी मारिली असती, रागानें धिक्कारिलें असतें आणि आश्चर्यानें स्तब्ध राहिलों असतों; आणि हे सगळे प्रकार एकदम केले असते.

कंद०— मग तसें करायला विलंब नको. कारण कंदन येथेंच उभा आहे.

मंदा०— ( चोहोंकडे पाहून ) कोठें दिसत नाहीं तो ?

कंद०— समोर उभा असून कां दिसूं नये ?

मंदा०— काय ? तूंच कंदन ?

कंद०— ( दाढी काढून व मंदाराच्या पायां पडून ) होय, महाराज. मीच आपला शतशः अपराधी कंदन.

मंदा०— बाळा, ऊठ ऊठ ! पण तूं जर कंदन तर मग तो कोण ?

कंद०— तो माझा प्रिय बंधु नंदन.

मंदा०— बरें, मी तरी मंदारच आहे ना ? आणि इंदिरा इंदिराच आहे ना ?

कंद०— ती इंदिरा आहे ह्मणून तर हा सारा खटाटोप.

( नंदन व इंदिरा प्रवेश करितात. )

कंद०— ( नंदनाच्या पायां पडून ) दादा, मला क्षमा करा. मीं आपले अनंत अपराध केले आहेत.

नंद०— ( एकीकडे ) माझें स्वप्न खरें झालें कीं काय ? ईश्वर करो, आणि तें पुरतेपणीं खरें न होवो ! ( उघड ) कंदना, ऊठ ऊठ ! अरे तुझ्यामध्यें आणि माझ्यामध्यें वडीलधाकटेपणा आहे कुठें ? तुझ्याकडून मला मोठेपणा नको आहे. प्रेम असूं दे ह्मणजे झालें.

कंद०— माझ्या प्रेमाचा आपणांला अनुभव येण्याला आपणांवर संकट मात्र कोणतेंही न येवो ! मीच पश्चात्तापानें शुद्ध झाल्यावर आपणांवर संकट तरी कोणतें येणार ? पण जर दुर्दैवानें आलेंच तर त्या संकटाला मदत न करितां आपल्यासाठीं प्राण देण्यालाही मी तयार आहें.

मंदा०— नंदना, अरे, इतके दिवस तूं कोण याचा पत्ताही लागूं दिला नाहींस ना ?

नंद०— मी आपणांस एक दुष्ट वार्ता कळविण्याला व आपणांस परत मजबरोबर घेऊन जाण्याला आलों होतों. पण अशीं कांहीं कारणें एकामागून एक होत गेलीं कीं माझा हेतु जागच्या जागींच राहिला.

मंदा०— ती दुष्ट वार्ता कोणती ?

नंद०— ती अमंगळ वार्ता कंदनाबद्दल होती. ईश्वरकृपेनें ती खोटी ठरली.

कंद०— खरीच ठरली ह्मणायची ! कारण पूर्वीचा कंदन नष्ट झालाच आहे.

मंदा०— ती वार्ता खोटी ठरली इतकेंच नाहीं, तर माझा शत्रु इंद्रजाल आणि इंदिरेचा वर या दोन्हीं नात्यांनीं हा मजकडे आला आहे.

नंद०—असें काय ? तरीच !

मंदा०—कंदनाचा वडील भाऊ ह्मणून त्याच्या व इंदिरेच्या लग्नाला तुझी अनुमति पाहिजे आहे.

नंद०—( एकीकडे ) मना, खंबीर हो. हीच तुझ्या परीक्षेची वेळ आहे. ( उघड ) महाराज, आपण वडील माणसें कराल तें मला मान्यच आहे. इंदिरेला आणि कंदनाला या लग्नापासून सुख झालें ह्मणजे मलाही त्यांत सुख आहेच.

इंदि०—( एकीकडे ) हाय हाय ! यांनीं आपला आधार काढून घेतला. आतां मी एकटी बाबांना काय बोलूं !

( चाल—मगमे श्याम मुसे० )

शिरिं अशनिच विपदा महा ही । चरणतलिंचि
जणुं धरणी विरावी ॥ ध्रु० ॥ स्थिति मम भयद
खचित शरण नुरत सकल जगतिं । सदय तात
करुं पहात पूर्ण घात मम दयित मन करित अति
निशित शरसम समयिं ॥ १ ॥

( उघड ) बाबा,—

मंदा०— बाळे, माझे उपकार मानण्याचें कांहीं कारण नाहीं. हें माझें कर्तव्यच आहे.

इंदि०—बाबा, तुह्मी मला दुसऱ्या एकावर प्रेम करण्याची आज्ञा केली होती ना ?

मंदा०—होय; आणि ती तूं फारच चांगल्या रितीनें पाळलीस. तशीच ही नवीन आज्ञाही पाळ.

इंदि०—पण प्रेमाला असें वरचेवर कसें फिरवितां येईल ?

मंदा०— कां बरें ! मी आपली आज्ञा नाहीं का फिरवीत ?

इंदि०— बाबा, आज्ञेचा उगम नुस्ता ओंठापासून असतो. उलट प्रेमाचीं मुळें हृदयांत खोल गेलेलीं असतात. तीं आपण खणूं लागलांत तर हृदयाची काय वाट ? ( रडत )

( चाल—जलवा जलाके मारा )

केली अपार माया । का ती अशी त्यजाया ॥
सुखिं ठेविलीत काया । बळि ती दुज्यासि द्याया
॥ १ ॥ शय्या मऊ पराची । दिधली सदैव साची।
ती का मला सदाची । शरपंजरीं पहाया ॥ २ ॥
संबोधिलेंत मजला । जिविंचा सदा जिव्हाळा ।
मर्मीं कठोर भाला । परिणामिं का पडाया ॥ ३ ॥

मंदा०—बाळे, माझा निश्चय तुझे अश्रु तेव्हांच धुवून टाकितील. पण कंदनाशीं तुझें लग्न करण्यासंबंधानें माझा शब्द गेलेला तुला माहित आहेच. माझ्या एकाही पूर्वजानें केलें नाहीं तें वचनभंगाचें पातक करून मी सर्व पूर्वजांसह रौरव नरकांत जाऊं काय! शिवाय तुझी ज्याच्यावर प्रीति आहे ह्मणतेस त्या नंदनाचीही या लग्नाला पूर्ण संमति आहेच.

इंदि०—बाबा, हे पहा अश्रु पुसले.

( चाल—आन बान जिया० )

सौख्य ज्यांत या पदांसि त्यांतचि मी गणिं सुखा
सि ॥ ध्रु० ॥ आपणची तनु दिधली । तिजवरि

सत्ता अपुली । घाल ज्या विवाहकालिं । वरिन
सुखें त्यासी ॥ १ ॥

नंद०—( एकीकडे ) शाबास ! हिच्या प्रेमावर शेवटीं पितृभक्तीचा विजय झालाच ! हिचें मजवर इतकें प्रेम आहे हें मला आतांपर्यंत समजलें नाहीं, त्याअर्थी माझ्यासारखा मंदबुद्धि मीच.

मंदा०—बाळे, तुझ्या मनांतलें शल्य गेलें असें मला अजून वाटत नाहीं.

इंदि०—( मंदाराच्या गळ्यास मिठी मारून व हंसून ) आतां तरी वाटेल कीं नाहीं ?

मंदा०—कां नाहीं वाटणार ? ही मिठी ह्मणजे संशयनिराकरण करण्याचें सर्वोत्कृष्ट प्रमाणच ह्मणायचें ! कंदना, माझी इंदिरा किती आज्ञाधारक आहे हें पाहिलेंस ना ? आतां हिचें हें मधुर हास्य कायम करणें मात्र तुझ्याकडे आहे.

कंद०—माझे प्राण गेले तरी बेहत्तर ! पण हें मधुर हास्य हिच्या ओंठांवरून मी कधीं मावळूं देणार नाहीं. हिचा मुखचंद्र आजपासून पौर्णिमेचा असावा असाच माझा सतत प्रयत्न राहील.

( कंदन व मंदार जातात. )

नंद०—( एकीकडे ) अरेरे ! बिचारी इंदिरा ! ज्या कोणास वरून सुंदर पालवी धारण करणारी, पण आंतून करपलेली लता पहावयाची असेल त्यानें हिची मूर्ति पहावी. ( जातो. )

इंदि०— ( स्वतःशीं ) हर हर !

( चाल-बाली उमरिया० )

घाली विधि कसा दारुण घाला । सेवित असतां
चित्त सुखाला ॥ ध्रु० ॥ वृष्टिनें लता तुष्टाचि
होतां । वीज पडुनि अवचित जणुं जाळि ति-
येला ॥ १ ॥ कांतसमागमसुख न मिळे तों । स-
कल मनोरथ माझे जाति लयाला ॥ २ ॥

अंक चौथा समाप्त.

# अंक ५ वा.



## प्रवेश १ ला.



नंदन— ( स्वतःशीं ) या साऱ्या उत्सवांत दोन अंतःकरणें मात्र कष्टी आहेत. बाकी चोहोंकडे आनंदीआनंद चालला आहे. आह्मीं उभयतांनीं आपल्या प्रेमाची पित्राज्ञेच्या होमांत आहुति दिली. त्या होमाच्या धुरानेंच कीं काय आमचे डोळे वारंवार भरून येत आहेत; आणि हें जग धूसर झाल्यासारखें दिसत आहे. माझें एक असो! कारण माझ्या हृदयाचा नेहमींच होम चाललेला आहे. त्या होमाची पूर्णाहुति जरी आज पडत आहे तरी अभ्यासानें मला तिचें फारसें वाटत नाहीं. पण बिचाऱ्या इंदिरेचें हृदय!

( चाल०—तुजे मोहे श्याम हमारा )

साहिल या असुखाला । कैंची कोमलगात्री बाला

॥ ध्रु० ॥ अग्निकणांची वृष्टि फुलावरी । तैसा हाही

घाला ॥ १ ॥ आप्राणांत असे विपदा ही । तीव्र-
गुणीं अतुला ॥ २ ॥

मला इंदिरा समदुःखी मिळाली आहे या विचारानें या हृदयाला मोकळें न वाटतां त्याला अधिकाधिक पीळ भरत चालला आहे. मीं मूर्खानें मजवरील तिचें प्रेम वेळींच खुडून टाकायचें, त्याचे ऐवजीं उलट अविचारानें त्याचा विकास केला. हें हृदय तुटून जाईल तेव्हांच याच्या यातना बंद पडतील. पण मी नाहींसा झाल्यावर तिला धीर कोणीं द्यावा? दुसऱ्यास दुःख होऊं नये ह्मणून आजपर्यंत धारण केलेले प्राण यापुढें इंदिरेचें दुःख हलकें करण्याकरितां वाहिले पाहिजेत. ( विहंग प्रवेश करितो. ) विहंगा, ही पेटी कसली घेऊन चालला आहेस?

विहं०—आज कंदनमहाराज इंदिराताईसाहेबांस वस्त्रालंकारांची भेट नजर करणार आहेत. ही सुवासिक द्रव्यांची आणि वस्त्रांची पेटी त्यांच्या सांगण्यावरून मी त्यांजकडे नेत आहें. ( जातो )

नंद०—( स्वतःशीं ) बिचारा कंदन आपल्या प्रियेच्या सुखाचीं बाह्य साधनें गोळा करण्यांत गुंतला आहे. पण जें शरीर वस्त्राभरणांनीं नटवायला तो पहात आहे त्याच्या आंत दुःखाचा काळाकुट्ट अंधार पसरला आहे हें बिचाऱ्याच्या स्वप्नींही नाहीं. ( चंडी प्रवेश करिते. ) चंडि, इतक्या घाईनें कुणीकडे?

चंडी— तिकडे कंदनमहाराज इंदिराताईसाहेबांना कोणती भेट द्यावी याचा विचार करीत आहेत. ही दागिन्यांची पेटी त्यांना दाखवावयाला मी नेतें आहें. ( जाते )

नंद०— आपण आतां या उत्सवाच्या स्थानापासून जरा दूर जावें, ह्मणजे इंदिरेच्या हृदयरूपी समाधीवर वहावयाचे हे पदार्थ दृष्टीस पडणार नाहींत. ( जातो )

---

## प्रवेश २ रा.

( कंदन, विहंग व चंडी )

कंद०— विहंगा, हा अरगजा आणि हीं अत्तरें सुगंधांत प्रियेच्या श्वासाची बरोबरी करतील, असें नाहीं मला वाटत. सुगंधि द्रव्यांना किंवा फुलांना चिरडून त्यांपासून हीं पैदा केलेलीं. यांच्यांत इंदिरेच्या श्वासांतल्याप्रमाणें सुगंधाचा जिवंत झरा कुठून आढळणार ? त्यांपेक्षां हे हार आणि गजरे शतपट बरे.

विहं०— पण अत्तरें आणि अरगजा वर्षानुवर्षें टिकतील. आणि हे हारगजरे संध्याकाळींच म्लान होऊन जावयाचे.

कंद०— सुंदर वस्तु अशाच क्षणभंगुर असावयाच्या. यौवन आणि सौंदर्य हीं तरी कुठें फार दिवस टिकतात ? असो, तर हीं अत्तरेंबित्तरें ठेऊन दे एकीकडे. तीं जर इंदिरेला अर्पण केलीं असतीं तर तिच्या फुलासारख्या कोंवळ्या हृदयाला आपल्या भावंडांच्या मरणाचा विचार असह्य झाला असता. विशेषतः हीं अत्तरें तिला फुलाच्या रक्ताप्रमाणें वाटलीं असतीं. माझा संकल्प तर तिला अशा सुखांत ठेवावयाचा आहे कीं, दुःख, मरण या कल्पना तिला स्वप्नांतही येऊं नयेत.

विहं०— आतां या वस्त्रांमधून निवड होऊं द्या.

कंद०— माझ्या इंदिरेच्या रंगाला कोणत्या रंगाचें वस्त्र शोभेल बरें ? तिच्या अंगाच्या वर्णाला पांढरें शुभ्र पातळ शोभेल, तर गालाच्या गुलाबीपणाला गुलाबी पातळ बरें दिसेल, आणि केंसांना काळी चंद्रकळा ठीक होईल.

विहं०— याला मी सुचवूं का एक तोड ?

कंद०— सुचीव बरें ?

विहं०— ताईसाहेबांच्या तोंडाचा रंग पडला दिवसाप्रमाणें, आणि केंसांचा पडला रात्रीप्रमाणें.

कंद०— तेव्हां दोहोंमधील संध्यारागाच्या रंगाचें गुलाबी वस्त्र पाहिजे ह्मणतोस ? ह्मणजे तें गालांनाही अनुरूप होईल.

विहं०— किंवा अस्मानी रंगाचेंही चालेल. गुलाबी रंगांत जशी दिवस आणि रात्र यांची थोडी थोडी छटा असते त्याप्रमाणें अस्मानी रंगांतही असते. अथवा शालू अस्मानी रंगाचा आणि शेला गुलाबी रंगाचा असावा.

कंद०— शाबास ! तोड पण तोड काढिलीस ! अगदीं बिनतोड !! मात्र अस्मानी शालूवर गगनांत जसे तारे तसे सोन्याचे बुट्टे मात्र लागतील हो ! नाहींतर सगळें बिघडायचें. चंडि, आतां अलंकार काढ पाहूं.

चंडी— हा पैंजणाचा जोड पहा.

विहं०— ठीक ! याची ताईसाहेबांच्या मंजुळ ध्वनीला चांगली साथ होत जाईल.

कंद०— किंवा तितका मंजुळ नसल्यामुळें विलग वाटून रोगाच्या सांथीप्रमाणेंच वाटावयाचा ! बरा आहे झालें तूर्त. पुढें ?

चंडी— हा रत्नखचित कंबरपट्टा !

कंद०— कंबरपट्टा ह्मणजे उरोभाग आणि नितंबभाग दोन

पारड्यांत घालून जोखण्याचा कांटाच ! तो जितका लहान असेल तितका बरा.

चंडी— हा पहावा मोत्यांचा हार. किती तरी तेजस्वी आहे!

विहं०—त्याचें अर्धें तेज तुझ्यामुळें आहे.

चंडी— इतकी का मी तेजस्वी आहें ?

विहं०— नाहीं ग ! निस्तेज आहेस ह्मणून त्याचें तेज तुलनेनें दुणावलें आहे.

चंडी— याचा वचपा चांगला निघेल, बरें का ?

विहं०— महाराज, मोत्यें ह्मटलीं ह्मणजे शिंपांचीं पोरें आणि शंखाचे भाचे. कान शिंपांप्रमाणें आणि गळा शंखासारखा असला तरच तीं खुलून दिसायचीं. नाहीं तर एखाद्या विजोड जोडप्याप्रमाणें अवयव व दागीना विशोभित दिसायचीं.

चंडी— हा पहा चंद्रहार.

कंद०— इंदिरेचा मुखचंद्र याचें नांव सार्थ करणार.

चंडी०— आणि ही बिंदी.

कंद०— इंदिरेच्या वयाला ही शोभणार नाहीं. शिवाय तिच्या ललाटावर जेव्हां घर्मबिंदु चकाकूं लागतात तेव्हां त्यांच्या शोभेपुढें

बिंदीची शोभा निस्तेज पडणारच. इच्यापेक्षां ती मोत्यांची जाळी बरी. आकाशांतील चांदण्यांप्रमाणें केंसांवर छान शोभेल.

विहं०— किंवा भुईवर पडलेल्या पारिजातकाच्या फुलांच्या सड्याप्रमाणें गोड दिसेल.

कंद०— विहंगा, तूं बराच मार्मिक आहेस कीं ! इतकी मार्मिकता तुला कोठून आली ?

विहं०— माझ्या अर्धांगीपासून. ज्याप्रमाणें कारंजाला साऱ्या बाजूंनीं दाब असला ह्मणजे त्याचें पाणी उंच उडतें, किंवा झाडाभोंवतीं पाण्याचें आळें असलें ह्मणजे तें जोरानें फोंफावतें, त्याप्रमाणें हिनें माझ्याभोंवतीं मगरमिठी मारल्यामुळें माझी कल्पनाशक्ति नेहमीं भराऱ्या मारीत असते.

कंद०— माझी वृत्ति आज फार प्रसन्न आहे; आणि माझें हृदय आनंदसागरांत पोहत असल्यामुळें साऱ्या जगानें माझ्याप्रमाणें सुखांत असावें असें वाटत आहे. चंडि, या उरलेल्या दागिन्यांपैकीं तुला जो आवडेल तो उचल पाहूं. अशी संकोचूं नकोस.

विहं०— आपण हें बक्षीस देतां ही आपली मेहरबानी आहे. परंतु वास्तविक पहातां नवरा हाच बायकोचा खरा दागीना.

चंडी— अहाहा ! उजेड पडला या दागिन्याचा !

विहं०— असें का बरें ह्मणतेस ? मी तुझ्या पायांतील पैंजणच नाहीं का ? पावलोंपावलीं लाथाडला तरी शब्द करण्याला तयारच.

तडाग ( प्रवेश करून )—महाराजांना प्रणाम असो !

कंद०— ( एकीकडे ) अरे, अशा मंगल प्रसंगीं हा अपशकुन कशाला ? ( उघड ) तडागा, तूं नगराकडे गेला होतास ना ?

तडा०—तुमच्याशीं बोलायचें नाहीं अशी मला राणीसाहेबांची आज्ञा आहे.

कंद०—मग आलास कुणीकडे ?

तडा०—तेंही तुह्मांला कळूं द्यायचें नाहीं. का चंडीबाई, खुशाल आहांत ना ? पण मीं तुमच्यापूर्वी तुमच्या नवऱ्याचें कुशळ विचारायला पाहिजे होतें. असो, मोहिनीराणीसाहेबांनीं इंदिराताईसाहेबांना ही भेट पाठविली आहे. ती त्यांची त्यांस पोहोंचती करा.

कंद०— ( एकीकडे ) मोहिनीच्या भगिनीप्रेमाला आज इतकें भरतें कसें आलें ? यांत कांहीं तरी कपट आहे खास !

चंडी— अरे वा ! माईसाहेबांनीं तऱ्हतऱ्हेचीं पक्वान्नें पाठविलीं आहेत.

कंद०—( एकीकडे ) यांत सगळ्या जगाला मारून टाकण्याइतकें विष असलें पाहिजे. ( उघड ) चंडि, आण ते सारे पदार्थ इकडे. ( चंडी त्यास देऊं लागते. )

तडा०— ताईसाहेबांखेरीज ही भेट कोणालाही न पोहोंचेल अशी व्यवस्था करण्याबद्दल राणीसाहेबांनीं मला बजाविलें आहे.

कंद०— इंदिरेच्या प्राणाचा धनी आतां मी होणार; तेव्हां तिच्या सगळ्या वस्तु माझ्या ताब्यांत राहिल्या पाहिजेत. ( हिसकावून घेतो. )

तडा०—( एकीकडे ) इतकीं पक्कान्नें पाहून स्वारीच्या तोंडाला चांगलेंच पाणी सुटलें आहे. ताईसाहेबांचें निमित्त पुढें करून सगळा खाऊ गट्ट करण्याचा विचार दिसतो. पण ह्मणावें मींही कांहीं दिवस घालविले आहेत तुमच्या संगतींत. दुसरे फसले ह्मणून मी नाहीं फसायचा. ( उघड ) मालकसाहेब, तुमच्या या संबंधाचीं फळें अशींच गोड येवोत अशी आपला जुना ताबेदार इच्छा करीत आहे.

कंद०— तडागा, माझ्याशीं अबोला धरण्याचा निश्चय विसरलास वाटतें !

तडा०— या पक्वान्नांमुळें तोंडाला जें पाणी सुटलें त्याच्या लोटाबरोबर माझा निश्चय कुठें वाहून गेला तें कळलेंही नाहीं.

कंद०— बरें, तूं आतां कुठें जाणार ?

तडा०— हा डबा उघडण्यापूर्वीं विचार होता दुसरीकडे रहाण्याचा. पण हा उघडून आपण ताब्यांत घेतल्यापासून आपणांकडेच उतरेन ह्मणतों. कारण ( डब्याकडे पहात ) आपली संगति फार गोड ! आणि आपला स्वभाव फार मिठा ! तेव्हां मी आपल्या छावणीकडेच जातों. ( जातो. )

कंद०— ( विहंग व चंडी यांस ) तुह्मीही हा पसारा आटोपून जा; कारण ही पहा या अलंकारांची आणि माझ्या एकनिष्ठ हृदयाची भाग्यशाली स्वामिनीच इकडे येत आहे. ( विहंग व चंडी जातात. स्वतःशीं ) वास्तविक हिला अलंकारांची काय जरूर आहे ?

( चाल— सांग मधुर नूपुररव कानीं )

देहिं रुचिर भूषणगण लेवुनि त्यांतें भूषविते
रमणी ॥ ध्रु० ॥ चंद्रमुखी धरि उडुमौक्तिकगण
वृथा गगनकुंतालिं रजनी ॥ १ ॥ रत्नाकरवल-
यांकित वागवि वृथाचि वसुभारा धरणी ॥ २ ॥

(इंदिरा प्रवेश करिते) इंदिरे, आतांपर्यंत मी तुझ्याजोग्यॉ जिनसांची निवड करीत होतों. परंतु आमची पुरुषांची कांहीं झालें तरी स्थूल व धोपट मार्गाची निवड; तिच्यांत स्त्रियांची सूक्ष्म आणि मार्मिक दृष्टि दिसून येणार नाहीं. अरे, हें काय? तुझ्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या आहेत. वेडे, मीं देण्यापूर्वींच तूं हा मौक्तिकहार चढविलास! आणि तो कुठें? तर डोळ्यांवर!

इंदि०— ( डोळे पुसून) आपणांला दिसावींत ह्मणून कांहीं मीं खोटीं आंसवें आणिलीं नाहींत. इच्छेविरुद्ध येतात त्याला नाइ-लाज आहे.

( तोडी–त्रिवट. )

काशि आवरूं हीं मम अश्रुजलें । वाहति नयनां
भेदोनि बळें ॥ ध्रु० ॥ हृदयसरीं रस हा सगळा ।
कोठोनि विपुल भरला न कळे ॥१॥ जरि मृण्मय
ही मम मूर्ति । तरि कां अजुनी नच ती वितळे ॥२॥

कंद०— आज सकाळपासून मी पहात आहें, तुझ्या तोंडावर श्रावणमासांतल्याप्रमाणें घटकेंत ऊन्ह आणि घटकेंत पाऊस

दृग्गोचर होत आहे. ही पहा पुन्हा सर आलीच ! (इंदिरेचे डोळे पुसूं लागतो. )

इंदि०— मी अजून कुमारिका आहें येवढें लक्ष्यांत ठेवण्याची विनंति आहे.

कंद०— ( दूर होऊन ) जरी आपणांमधील हें अंतर मला अत्यंत कष्ट देतें तरी तुला बरें वाटावें ह्मणून मी त्यालाही कबूल आहें.

इंदि०— आपण माझ्यावर इतकें निर्मल प्रेम करितां त्याला मी पात्र नाहीं.

कंद०— असें कां बरें ह्मणतेस? तुझ्या निर्मल देहाला हा कंदन पात्र नाहीं असें ह्मण पाहिजे तर ! जीवितेश्वरि, तुझें पाणिग्रहण करून मी केवढें पातक करीत आहें हें मला कळत का नाहीं? मर्कटानें माणिक हातीं घ्यावें, दैत्यानें अमृत घ्यावें, सर्पानें चंदनाचा आश्रय घ्यावा, त्यांतलेंच माझेंही कृत्य आहे हें मी जाणून आहें. पण काय करूं ?

( चाल—जो जिंकुनि पांच जणांसी )

गतजीवन मीन तटाकीं । हें जीवन तुजविण
लोकीं ॥ तव नेत्रकिरण पथिं नसती । जन्मांध

तशी मग वृत्ति ॥ तव मंजुल वच नच कर्णीं। तरि
कर्कश वाटे धरणी ॥ तव शीत कर न सुखवाया।
प्रलयाग्नि व्यापि जगा या ॥

—कृपा कर, आणि या माझ्या सुखकर स्वप्नाचा भंग करूं नकोस. मी हल्लीं तुझ्यायोग्य नाहीं खरा; पण तूं माझा अंगीकार केलास कीं तुझ्या आज्ञेप्रमाणें पवित्र आचरण करण्यांतच मी धन्यता मानीन, व चोहोंकडे सद्गुणांचा प्रसार करीन; कुटिल जनांशीं तुझ्या वेणीच्या केंसांप्रमाणें कुटिल, पण सज्जनांशीं तुझ्या नासिकेप्रमाणें सरळ वागेन. तुझ्या वर्णाप्रमाणें शुद्ध आचरण ठेवून तुझ्या श्वासांप्रमाणें माझ्या कीर्तीचा सुगंध साऱ्या जगभर दरवळत ठेवीन. ज्याप्रमाणें तुझ्या रूपांत रेंखीवपणा व विभ्रम यांची सांगड झाली आहे त्याप्रमाणें मीही आपल्या वर्तनांत न्याय व दया या दंपत्याची सांगड घालीन. यांन मी प्रौढी मारितों असें समजूं नकोस. हा सारा उपदेश मला तुझ्या रूपानेंच केला आहे.

इंदि०—( एकीकडे ) माझा निश्चय यांना कळल्यावर हे खास प्राण सोडतील.

कंद०—इंदिरे,

( चाल—मजा देते हैं क्या यार )

कृतनिश्चय तूं गमसी। स्थिरगात्र देहीं होसी॥ध्रु०॥
अति शांत ललाट असे। किति निश्चल दृष्टि दिसे।
खर दंत अधरदंशें। तव भाव दाविति निमिषीं
॥ १ ॥ थरकांप सुटें मजला। मम धीर गळे
सगळा। भय उपजतसे मतिला। उर दाटला हा
श्वासीं ॥ २ ॥

—तुझा निश्चय माझ्या प्रियतम आशेच्या आड तर येत नाहीं ना? तुझें मौन पाहून मी संशयाच्या भोंवऱ्यांत सांपडलों आहें. तेथून मला हात देऊन वर काढ. मला तूं पाणिदान करणार ना?

इंदि०—त्याला मीं आपली संमति केव्हांच दिली आहे.

कंद०— अहाहा ! मी तुझा याबद्दल सदैव ऋणी आहें. ( थांबून ) पण हातांचें आणि हृदयांचें मीलन यांत जमीनअस्मानचें अंतर असतें. पहिलें जरी ईश्वरनिर्मित आणि दुसरें मनुष्यकृत असलें तरी पहिल्यापेक्षां दुसऱ्यांतच स्वर्गसुख अधिक आहे.

इंदि०— ( एकीकडे ) तोंपर्यंत जगेन तर ना

कंद०— ( एकीकडे ) हिच्या मनांतील माझ्याबद्दलची अढी अजून गेली नाहीं. ( उघड ) इंदिरे, तुझ्या मनांत मजबद्दल प्रेम कधीं तरी निर्माण होईल का ?

इंदि०— नवीन निर्माण कशाला व्हायला पाहिजे ?

कंद०— तर मग हल्लीं सुद्धां तुला माझ्याबद्दल प्रीति वाटते ? अहाहा ! हें ऐकून मी धन्य झालों ! मघांपासून तुझ्या भाषणरूपी झोंपाळ्यावर बसून एकदा खालीं तर दुसऱ्यानें वर याप्रमाणें लागोपाठ झोंके खातों आहें. शेवटच्या हेलकाव्यानें मात्र मला एकदम स्वर्गसुख दाखविलें ! ( एकीकडे ) पण प्रेम किती तरी प्रकारचें असतें ! बंधुप्रेम, पितृभक्ति, मातृवात्सल्य या साऱ्या प्रीतिलतेच्या शाखा होत. क्षुद्र जंतूंवरील करुणा सुद्धां प्रेमाच्याच साम्राज्यांत येते. ( उघड ) बरें, तुला मजबद्दल ज्या प्रकारचें प्रेम वाटतें त्या प्रकारच्या प्रेमाचा तुला या पूर्वीं कधीं अनुभव आला होता काय ?

इंदि०— कधींच नाहीं.

कंद०— ( आनंदानें एकीकडे ) झाली पूर्ण खात्री ! आतां संशयाचें नांव नको ! ( उघड ) कां बरें अनुभव आला नाहीं ?

इंदि०— कारण मला देवानें भाऊच दिला नाहीं.

कंद०— ( एकीकडे ) हर हर ! रसातळाला गेलों ! पुन्हा डोकें वर निघण्याची आशाच नको ! ( उघड ) इंदिरे, भावाचें प्रेम आणि प्रेमाचा भाव यांमध्यें महदंतर आहे. प्रेमभावाच्या मानानें भावाचें प्रेम अगदीं निःसत्त्व ! त्याची सारी भिस्त जीवितौघांच्या उगमावर. पण खऱ्या वैवाहिक प्रेमाची उभारणी जीवितप्रवाहांच्या संगमावर असते. माझ्या चित्तभूमींत तशा प्रेमाचें बीज असल्यामुळें त्याशीं विसंगत असें भावाचें प्रेम त्यापासून अंकुरित होण्याचा मुळींच संभव नाहीं.

इंदि०— मी तरी आपल्याविषयींच्या एका प्रेमाला बाजूला सारून दुसरें त्याचे जागीं कसें स्थापन करूं ?

कंद०— हें जर खरें तर मग मला पाणिदान करण्याला तूं कशी सिद्ध झालीस ?

इंदि०— केवळ हस्तस्पर्शाचा भगिनीप्रेमाशीं विरोध नाहीं म्हणून.

कंद०— आणि याच्या पुढचा प्रसंग आला तर ?

इंदि०— त्यालाही माझी तयारी आहे.

कंद०— ती कशी ?

इंदि०— माईनें माझ्याकरितां जो खाऊ पाठविला आहे ह्मणून चंडी सांगत होती तोच मला या कामीं योग्य तो सल्ला देईल.

कंद०— काय ? विषसेवन करणार ?

इंदि०— विषापेक्षां भयंकर प्रसंग आला तर तें घेण्यांत काय वाईट आहे ?

कंद०— मी तो खाऊ तुझ्या हातीं लागूंच देणार नाहीं.

इंदि०— नाहीं दिलात तर आपण जे दागिने माझ्या अंगावर घालणार आहांत त्यांतीलच एखादा माझ्या उपयोगीं पडेल.

कंद०— हिरकणी खाऊन प्राणनाश ?

इंदि०— माझें पातिव्रत्यरत्न जर त्यानें निष्कलंक राखतां येत आहे तर हिरकणी खाण्यांत वावगें कोणतें ?

कंद०— एकूण माझ्याशीं लग्न होतांच प्राणत्याग करण्याचा तुझा निश्चय झाला आहे ? आणि एकदा तुझे प्राण गेले ह्मणजे त्यांच्या मागोमाग माझेही जाणारच. कारण त्यांची भूकतहान तृप्त करण्याला दुसऱ्या कोणत्या इंदिरेचें मधुर हास्य आणि लावण्यजल त्यांना मिळणार आहे ? त्यापेक्षां उभयतांनीं जिवंत राहून इतर प्रकारच्या प्रेमाचा आस्वाद घेणें काय वाईट ? इंदिरे,

( चाल—ठेविं विरोधी भावाते )

सुखशैलाच्या तुज शृंगीं। बसवावें ही मृदुलांगि ।
धरिलि मनीषा अंगीं । भंगे परि दुर्दैवतरंगीं
॥ १ ॥ दुःख तुला मत्संपर्कें । आजचि सुख सु-
कलें असुखें । बघवेना तें हारिखें। भासे कमलाचि
भरलें पंकें॥२॥दुःखमुक्त तुज करण्यातें।वचनमुक्त
करितों तूंतें । अंतरलौंचि सुखातें । लाभो सदैव
तुजासि तरी तें ॥३ ॥ शोकमोक्ष करण्या पुढती ।
स्थापिन हृदयीं तव मूर्ति । तद्ध्यानबलें अंतीं ।
मिळविन तव चरणांशीं वसति ॥ ४ ॥

इंदि०— खरेंच का हें? काय तरी बाई आपलें औदार्य! कंदन महाराज, आपण आपल्या औदार्यानें मला खालीं पहायला लाविलें.

( चाल०— जरा मिलनेका करदेंगे )

हा स्वभाव उदार किति अपुला । मम सुखार्थ
निजार्थही त्यजिला ॥ ध्रु० ॥ बंधु विलसतां ।
खचितचि आतां । सुखवुनी भगिनी मनीं
धाला ॥ १ ॥

केद०— इंदिरे, हा स्वार्थत्याग करितांना माझी काय स्थिति होत आहे याची तुला कल्पना नाहीं; आणि तुझ्या भावि सुखांत ती न होणें हें सर्वथैव इष्ट आहे. यापुढें तूं आणि नंदन सुखानें रहा. तुमच्या सुखांत व्यत्यय येऊं नये ह्मणून मी देशांतर करणार. या हतभाग्याची आठवण कधींही होऊं देऊं नकोस; कारण ती दुधांत पडलेल्या मिठाच्या खड्याप्रमाणें तुमच्या आनंदाचा विरस करील. तुझी मूर्ति मात्र मला अखेरची डोळे भरून पाहूं दे. कारण याच मूर्तीनें मला पशूंतून माणसांत आणिलें,आणि याच मूर्तीच्या प्रेमानें माझी चित्तशुद्धि केली. तुझी मूर्ति माझ्या चित्तांत सांठवून ठेवायला तर तुझी हरकत नाहीं ना? मला त्या मूर्तीचें चित्रही बस झालें. अति उच्च वृक्षाला जरी हात पोहोंचले नाहींत तरी त्याच्या छायेनें आराम होतोच होतो. ( स्फुंदत ) इंदिरे, या अश्रूंबद्दल मला क्षमा कर. माझ्या मृत प्रेमाला ही शेवटची तिलांजलि आहे, आणि तुझ्या पायांवर अभिषेक करण्याचाही हा शेवटचाच प्रसंग आहे. तुझें नंदनावर जें उत्कट प्रेम आहे त्यानें तुला माझ्या प्रेमाची चांगली कल्पना करितां येईल. एका घटकेपूर्वीं तुला जग जसें अरण्यवत् वाटत होतें तसें मला या घटकेस वाटत आहे. मनाच्या अशा दारुण स्थितींत माझी तुला थोडी तरी कींव येत असेल तर मला एक शेवटची विनंति करावयाची आहे.

इंदि०—( रडत ) बोला लवकर! आपल्या एकेक शब्दानें माझें हृदय कसें विदीर्ण होत आहे !

कंद०—दुसरी कांहीं नाहीं. तितकें भाग्य पदरीं असतें तर मी आज प्रेमानें तुझ्या मुखाचें चुंबन घेतलें असतें. पण मी या सुखास पात्र नाहीं. तुझ्या आणि माझ्यामध्यें एकच नातें राहिलें आहे. तें कोणतें विचारशील तर स्वामिनी आणि तिच्या गुणांनीं विकत घेतलेला दास हेंच !

इंदि०—महाराज, आपली योग्यता फार मोठी असून आपण विनाकारण स्वतःस हिणवून घेतां. मला आपला शोक पहावत नाहीं. मी जातें येथून.

कंद०— एक क्षणभर थांब; आणि मग मला दूर लोटून वाटेल तिकडे जा. तुझ्या चरणांचा दास ह्मणून मला तुझ्या पदनखांचें चुंबन घेऊं दे.

( चाल–वाजे डमरु हरकर )

पाहों दे चरण निज। लागो शिरिं चरणरज। लाभ
अंतिम। त्यासि मानिन अवितथ समज ॥ ध्रु० ॥

नाथ तव व्हायासि पात्र न । दास करिती मज
तव सुगुण । अल्प मोलालागीं देउन । अदय
होउन लोटिंना मज ॥ १ ॥

इंदि०— मीं आपल्या पायां पडायचें, तें हें काय उलटेंच ?

कंद०— लाथेनें झुगारून देईपर्यंत मी आपला हट्ट सोडणार नाहीं. ( इंदिरेच्या पायाचें चुंबन घेऊं लागतो. ती रडत जाते. ) ( स्वतःशीं ) माझ्या देवतेच्या चरणांस अश्रुस्नान घालण्याची इच्छा तशीच अतृप्त ठेवून ती अदृश्य झाली. इंदिरेनें माझा त्याग केल्याबरोबर माझें भूतकालाशीं जें बंधन होतें तें ताडकन् तुटून गेलें. आतां भविष्यकाळाचा सारा प्रदेश अंधकारमय, शून्य आणि भयाण वाटत आहे. त्यांतून प्रवास करण्याला सोबतीण कोण ? —तर आत्यंतिक निराशा! त्या प्रवासाचा आणि त्या सोबतिणीचा बरोबर नायनाट केला तर ? पण असें करणें नामर्दपणाचें होईल. त्यापेक्षां माझ्या इंदिरेस अत्यंत आवडता जो सन्मार्ग त्याचें आचरण करून दिवस कंठणें शतपट बरें. पण त्या सन्मार्गावर मला दीपिका कोण ? एखादें सत्कृत्य केल्यावर मला आपल्या सुहास्यानें उत्तेजन कोण देणार ? जगांत जीं अनेक महत्कृत्यें होत आहेत त्यांच्या मुळाशीं प्रिय जनाचा संतोष व्हावा ही प्रबळ इच्छाच दिसून

a sweetheart

येईल. दयितेचा नयनबाण आपणांवर पडावा ह्मणून वीर समरांत शत्रूंच्या असंख्य बाणांचा मारा आपल्या अंगांवर घेतात. वल्लभेचा क्षणिक कटाक्ष आपणांवर पडावा ह्मणून कवि अजरामर काव्यें करितात. पण मी कशाची आशा धरूं? सद्गुणास निराळ्या बक्षिसाची अपेक्षा नसते हें तत्व माझ्यासारख्या निढीवलेल्या पातक्यास कुठून लागू पडणार? या पाप्यानें हजारों प्राणांची आहुति घेतली, शेंकडों कुटुंबें रसातळाला नेलीं, शेवटीं आपल्या वडिल भावाची लक्ष्मी व कलत्र (wife) हरण करण्याचा प्रयत्न करण्याला सुद्धां मागेंपुढें पाहिलें नाहीं; त्याला सन्मार्गाचरणानें शांति कुठून होणार? आतां मृत्यु हीच माझी शांति! मनुष्याच्या आयुष्यांत असा एक काळ येतो कीं, तेव्हां त्याचें मन बाह्य विषयांकडून स्वतःच्या आत्म्याकडे वळतें. माझ्या आयुष्यांतील चालू काळ हा अशापैकींच आहे. इंदिरेबद्दलच्या प्रेमानें माझी स्वतःची योग्यता माझ्या नजरेस आणिली. पण इतक्या उशीरानें आत्मशुद्धि होऊन काय उपयोग? तें कांहीं नाहीं, आजपर्यंत माझ्या हातून ज्या अनेक हत्त्या झाल्या त्यांचा शेवट मला स्वतःची हत्त्या करूनच केला पाहिजे.

तडाग ( प्रवेश करून )—( स्वतःशीं ) राणीसाहेबांनीं मजवर जी कामगिरी सोंपविली आहे ती पार पाडण्याची अजून

सांधिच सांपडत नाहीं. या कामीं मालकांचा सल्ला घ्यावा तर राणीसाहेबांची त्याबद्दल सक्त ताकीद कीं, त्यांच्यापाशीं ही गोष्ट मुळींच काढावयाची नाहीं. असा मी सांप्रत मोठ्या पेंचांत सांपडलों आहें. मालक आज फार दुःखांत दिसत आहेत. नंदनमहाराजच जर या दुःखाला कारण असतील तर मग यांना आपल्या कटांत घ्यायला कांहीं हरकत नाहीं. मी यांना कटांत घेण्यास निमित्तच पहात आहे. ( उघड ) मालकसाहेब, तिकडे चंडी आणि विहंग यांनीं मारे आनंदीआनंद चालविला आहे; आणि तुह्मी इकडे दुःखांतच ? ताईसाहेबांचें आणि आपलें पहिलें भांडण झालें वाटतें ? पहिल्या चुंबनाप्रमाणें पहिल्या भांडणांतही कांहीं निराळी मौज असते.

कंद०— ( तडागाच्या गळ्यास मिठी मारून ) तडागा, माझा पुरा घात झाला ! माझें प्रारब्ध फुटलें ! !

तडा०— अरेरेरे ! मालकसाहेब, हें काय ? कर्दनकाळालाही भारी असें तुमचें धैर्य कुठें गेलें ? असे बायकांसारखें रडतां काय ?

कंद०— तडागा, मी गाईपेक्षां गरीब झालों आहें. धीर धरूं तरी कशाच्या जोरावर ? खालून धरणी आणि वरून आकाश फाटलें तर, तडागा, कशाचा आश्रय करायचा ?

तडा०— पण असे हताश व्हायला झालें तरी काय ?

कंद०— मी इंदिरेला आंचवलों ! आणि तें सुद्धां तो गोड घास माझ्या ओंठाशीं येतो आहे तोंच !

तडा०— हें बहुधा नंदनमहाराजांचेंच कपट असलें पाहिजे. असें होईल हें राणीसाहेबांनीं तुमच्यापूर्वींच ताडलें असावें.

कंद०— कशावरून ?

तडा०— त्यांना पुन्हा मारण्याचें त्यांनीं मजवर सोंपविलें आहे ह्मणून. महाराज, तुह्मी आतां मजवर सगळा हवाला ठेवून असा. मी करितों त्यांचें चांगलें कंदन ! तुह्मी नुस्ता मधून मधून मला सल्ला द्या ह्मणजे झालें.

कंद०— ( एकीकडे ) मोहिनीच्या या नव्या कारस्थानापासून नंदनाचा जर बचाव केला तर त्याची व इंदिरेची माझ्या हातून थोडी तरी सेवा होऊन तिच्या स्मृतींत माझें नांव कृतज्ञतेशीं संलग्न असें कांहीं काळ तरी राहील. मरणानंतर माझ्या मूर्तीस तिच्या हृदयांत एक कोपरा जरी रहावयास मिळाला तरी मी तेथें आनंदानें गुजारा करीन. ( उघड ) तडागा, नंदनाला ठार मारण्याची कल्पना मला मानवली ! त्याला हुलकावणी देऊन एकीकडे नेण्याचें काम माझें ! या कामांतील इतर बाबी सावकाशपणें ठरवूं. चल. ( दोघे जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

नंदन— ( स्वतःशीं ) प्रेमाचा काय प्रभाव आहे पहा ! परिसाप्रमाणें तें लोखंडाचेंही सोनें करून टाकितें. कंदनाचा स्वभाव मूळचा किती तरी मानी, एककल्ली, हेकेखोर आणि तापट होता ! तोच आतां दीन, विचारी, मनमिळाऊ आणि कोमल मनाचा झाला आहे. त्याच्या मनाचा मोठेपणा तर कळसाला जाऊन पोहोंचला. आपल्या प्रियतमेला दुखवूं नये ह्मणून तो तिचाही त्याग करण्याला सिद्ध झाला. शाबास, कंदना ! या कृत्यानें तूं आपलीं पूर्वीचीं सर्व पातकें धुवून टाकिलींस; इतकेंच नाहीं तर आह्मा सर्वांना लाजेनें खालीं पहायला लाविलेंस. (कंदन प्रवेश करितो.) कंदना, मला घट्ट आलिंगन दे पाहूं ! ( दोघे भेटतात. )

कंद०— दादा, मी तुमच्या आलिंगनाला पात्र नाहीं.

( चाल– काहे छोड प्यारते )

सदय व्हा क्षमा करा । अपराधांतें । ठाउकें नवनीतासम हृदय आपुलें ह्मणुनि बंधु हा करि याचना ॥ध्रु०॥ द्रोह थोर चरणांशीं या । आज-

वरी घडला वाया । त्याच पदीं वाहिन काया ।
त्यांविण शम होइना ॥ १ ॥

नंद०— बाळा, तुझ्या ज्ञात आणि अज्ञात सगळ्या अपराधां- बद्दल तुला पूर्ण क्षमा आहे.

कंद०—यानें माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें. नाहीं; अजून थोडें आपल्यापाशीं मागणें आहे. माझ्या दुष्कृत्यांत जीं जीं माणसें सामील होतीं त्यांच्या गत आणि भावी अपराधांबद्दल तुह्मीं क्षमा केली पाहिजे.

नंद०—तुझ्या क्षमेंत त्यांची आलीच.

कंद०—दादा, तुह्मी किती तरी उदार आहांत! आणि अशा सत्पुरुषाशीं कपट करण्यांत मी सारा जन्म घालविला ना? धिक्कार असो मला!

नंद०—बाळा, उगा रहा. तुझ्या खंबीर मनाला हें वर्तन शोभत नाहीं.

कंद०—बरें, मीं हें सारें कशाकरितां केलें? तर माझ्या प्रबळ वासनांची तृप्ति व्हावी ह्मणून! आणि अखेरीस माझी सर्वांत प्रिय- कर वस्तु धरण्याकरितां मी हात पसरतों तोंच दुष्ट दैवानें ती मल नाहींशी केली! दादा, मीं इंदिरेला पार विसरून जाण्याचा निश्चय

करून मन दगडासारखें केलें आहे खरें; पण अजून तिचा विचार आला कीं तें घाबरें होऊन जातें! इंदिरे, तुझ्या मूर्तीची मी आमरण प्रेमानें उपासना करणार. पण मी हे उद्गार कोणापाशीं काढीत आहें ? दादा, मी आपलें अजाण बालक आहें. मला पुन्हां क्षमा करा.

नंद०—कंदना, असा चित्तक्षोभ करून घेऊं नकोस. जरा विश्रांति घे, ह्मणजे चित्त पूर्ववत् स्थिर होईल. एक पत्नी असतां दुसरी करणार नाहीं हा माझा निश्चय तूं विसरलास वाटतें ?

कंद०—(स्वतःशीं) यांच्या उदार मनाची जों जों कसोटी पहावी तों तों त्याचें अपारत्व नजरेला येत आहे. यांचा हा निश्चय बदललाच पाहिजे. यांना मीं जें पत्र लिहून ठेविलें आहे त्यांतील माझी अखेरची विनंति मान्य करण्याबद्दल यांचें वचन घेतलें पाहिजे. मात्र यांना संशय येऊं नये अशीही खबरदारी घेतली पाहिजे. ( उघड ) हो, विसरलोंच ! मी आपणांपाशीं एक महत्त्वाची विनंति करण्याकरितां आलों; पण मनःक्षोभामुळें तें तसेंच राहून गेलें. आज आपण सगळा दिवस घरांत बसून रहा. बाहेर पडूं नका. इंदिरेच्या सहवासांत एक दिवसच काय, पण सारा जन्म एकाच ठिकाणीं काढणें कांहीं जड नाहीं.

नंद०— कंदना, किती विक्षिप्तपणाचें मागणें आहे हें ! लहानपणचा स्वभाव अजून कायम आहे.

कंद०— जित्याची खोड मेल्याशिवाय कशी जाणार ? तरी पण बालकाचें कोड आपण पुरविलेंच पाहिजे. आपणांवाचून मला आतां कोण आहे ?

नंद०— हा मी चाललों पहा तुझ्या ह्मणण्याप्रमाणें स्वतःला घरांत कोंडून घ्यायला.

कंद०— इतक्यांतच नको. माझी दुसरी एक विनंति आहे. मी कांहीं दिवस देशांतर करणार आहें. या भेटीनंतर माझ्याकडून आपणांला जें पत्र येईल त्याप्रमाणें अक्षरशः वर्तन आपण केलें पाहिजे.

नंद०— कंदना, यापुढें तुझा शब्द मी आज्ञेप्रमाणें मानीत जाईन. पण येथें आतां अधिक वेळ राहिलों तर तुझा श्रम वाढत मात्र जाईल; तेव्हां मीं जावें हें बरें.

कंद०— आणि मला शेवटचें आलिंगन द्यायचें नाहीं का ?

नंद०— आज तुझें चित्त खास बावरलें आहे. ( कंदनास आलिंगन देऊन ) बाळा, कपाळाला किती तरी घाम आला आहे ! आणि तोंड तरी किती सुकून गेलें आहे ! ( कंदनाचें

कपाळ पुसतो. ) तसेंच हे केंस कसे विस्खलित झाले आहेत ( त्याचे केंस सावरतो. )

कंद॰—मला आतां घट्ट कवटाळून घेऊं द्या. ( आलिंगन देऊन ) बस्स ! पुरे ! अमृत कितीही प्यायलें तरी शोष पडणारच. दादा, तुह्मी आतां जा. ( नंदन जातो. त्याजकडे निरखून पहात ) माझ्या पश्चात् दादांनीं आपल्या उदार स्वभावाला अनुसरून इंदिरेचा स्वीकार करण्यास अनमान केला असता. पण मीं आपल्या पत्रांत त्यांना त्याबद्दल आग्रहाची विनंति केली आहे, त्यामुळें त्यांना आपला हेका चालवितां येणार नाहीं. ज्या पुरुषानें मोहिनीस आजपर्यंत अनुपम औदार्यानें आपल्या सख्ख्या बहिणीप्रमाणें वागविलें त्याला त्याबद्दल इंदिरेची प्राप्ति हेंच खरें बक्षीस होय. आतां आपणही संकेताच्या झाडाखालीं जाऊन बसावें. ( चालून ) सचेतन सृष्टीचा तर निरोप घेतलाच. आतां अचेतन सृष्टीचा घ्यावयाचा राहिला आहे. अहो गगनचुंबित वृक्षांनो, तुमच्या छायेखालीं जो काळ गेला तसा आनंदाचा काळ मला जन्मांत लाधला नव्हता. तुह्मांला माझा अखेरचा नमस्कार असो ! अहो नगश्रेष्ठांनो, तुह्मी माझ्या निर्मल प्रेमाचे साक्षी आहांत. मी तर तुह्मांस सोडून चाललोंच ! पण तुह्मीं आजपर्यंत खडा पहारा करून त्या रमणीरत्नाचें जसें संरक्षण केलें तसें पुढेंही

करा. प्रतिध्वनिरूपानें तुह्मीं आपला हुंकार दिला हे फार उपकार झाले. तुह्मांला माझा अखेरचा प्रणाम असो! माझा प्रिय मित्र इंदीवर यास मंदारमहाराजांचें राज्य त्याच्या स्वाधीन करण्याविषयीं पत्र लिहून तें दादांना व तडागास लिहिलेल्या पत्रांबरोबर खिशांत ठेविलच आहे. आपल्या धन्याचा वध केल्यानंतर तडाग जेव्हां खिसा चांचपील तेव्हां त्याला तिन्ही पत्रें दिसून खरा प्रकार कळेल. त्याच्या इमानीपणाबद्दल अखरचें बक्षीस ह्मणून ही अंगठीही येथेंच ठेऊन देतों.

तडाग ( प्रवेश करून )—( एकीकडे ) बरा सांपडलास आतां एकटा! एकदा मला झुकांडी दिलीस; पण आतां माझे मालक थोडेच येणार आहेत तुला सोडवायला! ( कंदनास वार करितो. )

कंद०— मोहिनि, तुला देव क्षमा करो! इंदिरे, तुला देव अखंड सुखांत ठेवो! हीच माझ्या आत्म्याची अखेरची इच्छा! ( पडतो व प्राण सोडतो. )

तडा०— ( कंदनाचा खिसा चांचपून ) अरे, हें काय ? हीं पत्रें तर आमच्या मालकांनीं लिहिलेलीं! आवाजावरूनही मला संशय आलाच. तडागा, अरे मूर्खा, हें काय केलेंस ? मालकांनीं तुला पोटच्या पोराप्रमाणें वागविलें त्याची हीच का फेड केलीस ? यापेक्षां तूं कां नाहीं मेलास ? धनीसाहेब, आतां मी राणीसाहेबांना

'तोंड कसें दाखवूं ? तुमच्याकरितां हा सारा खटाटोप केला, आणि तुह्मीच कसे हो सोडून गेलांत ? अरे, पण ही चाहूल कसली ? माझ्या मालकांशीं अखेरचे दोन शब्दही बोलण्याची चोरीच ना ! धनीसाहेब, तुमच्या पायांवर डोकें ठेवितों, आणि तुमची अंतकाळची खूण ह्मणून ही आंगठी घेऊन आपला निरोप घेतों. हीं पत्रें ज्यांचीं त्यांना स्वतः पोंचती करून नंतर तुह्मीं या पत्रांत लिहिलेला निरोपही राणीसाहेबांना कळवीन. ( जातो. )

---

## प्रवेश ४ था.

मोहिनी— ( स्वतःशीं ) विष तयार करून ठेविलें; पण घेण्याचा धीरच होत नाहीं. मला चांडाळणीला कंदनमहाराजांचे अमोल प्राण हरण करितांना कांहीं वाटलें नाहीं; आणि या स्मशानाप्रमाणें भासणाऱ्या जगांत हा निर्माल्यवत् देह आणखी कांहीं दिवस पोसून वाढवावा हा लोभ कांहीं सुटत नाहीं ! तडागाकडून त्यांना मारविलें हें कृत्य विषापेक्षांही भयंकर; पण तें माझ्या प्रकृतीला मानवलें; आणि या विषाची भीति वाटते ! बरें, मी अशीच जिवंत राहिलें तर यापुढें सुखाची आशा तरी आहे काय ?

नंदनमहाराजांनीं जरी आजपर्यंत मजवर गय केली तरी या माझ्या शेवटच्या कृत्यानें त्यांचीहि शांत वृत्ति ढळेल, आणि नंतर होणाऱ्या यातनांपुढें यमयातनाही गोड वाटतील. कंदनमहाराजांची मला क्षमा करण्याबद्दलची विनंति जरी त्यांनीं उदारपणानें मान्य केली तरी असें लाजिरवाणें जिणें वहाण्यासारखें मला असें कोणतें महत्कृत्य पुढें साधावयाचें आहे ? उलट या एका पेल्याच्या मद्-तीनें नंदनमहाराजांच्या सुखाच्या मार्गांतील कांटा दूर केल्यासारखें होऊन कंदनमहाराजांचें अक्षय्य समागमसुख मला हातीं आणितां येणार आहे. त्या राजबिंड्यास मीं परिवारापासून दूर केलें, त्या-अर्थीं त्याच्या कल्याणाची काळजी मला नको का वहावयाला ? सतत दहा वर्षें मजसारख्या अपात्र स्त्रियेकरितां सारखे श्रम केल्या-नंतर माझी सेवा हेंही बक्षीस त्यांना मिळूं नये का ? मी जर या विषाला याप्रमाणें भ्यालें तर त्या धाडशी वीराची सहचारिणी होण्यालां मी अगदींच अपात्र असें नाहीं का ठरायचें ? बरें, मी त्यांना भेटण्याकरितां तांतडीनें निघून गेलें,आणि त्यांनीं माझा धिक्कार केला तर ? महाराज, माझा अव्हेर नाहीं ना करणार ? आपण तडागाच्या पत्रांत माझ्याकरितां जो निरोप लिहून ठेविला आहे त्याप्रमाणें मी अक्षरशः वागेन. मग तर झालें ना ? आपण नंदनमहाराजांवर व इंदिरेवर प्रेम करण्याची मला आज्ञा करितां; ती मला शिरसावंद्य

आहे. त्यांजवर प्रेम करून आपणांस जर सुख होत आहे तर मी त्या सुखाच्या आड कशी येईन ? आपलें ज्यांच्यावर प्रेम त्यांच्यावर मीही प्रेम नाहीं केलें तर आजपर्यंत प्रत्येक गोष्टींत आपल्या कलाप्रमाणें वागलें तें व्यर्थ नाहीं का होणार ? देवा, त्या उभयतांना नेहमीं सुखांत ठेव ! अहाहा ! हें ऐकून महाराजांनीं आपली पसंती दाखविली. आतां उशीर करितां कामा नये; नाहीं तर त्यांना राग येईल. विषा, तुझें सेवन केलें ह्मणजे राम ह्मणावा लागतो असा शंकरासारख्यांना सुद्धां अनुभव आला. या अबलेला आपलें ब्रीद खरें करून दाखीव. ( विष पिते. )

( तडाग व पुष्करिणी धांवत येतात. )

पुष्क०— राणीसाहेब, हें काय ? आपण चाललांत, पण आमची काय वाट ? आह्मीं आतां कोणाचा आश्रय धरायचा ?

मोहि०—पुष्करिणि, मला आतां बोलायला फार वेळ नाहीं, कारण माझा जीव आंत ओढूं लागला आहे. तर असा शोक न करितां मी अखेरचें सांगतें तें लक्ष्यांत ठेवा. ( पुष्करिणीचा हात तडागाच्या हातांत देऊन ) मीं हे हात जुळवून तुह्मांला एकमेकांच्या स्वाधीन केलें आहे. असेंच प्रेम शेवटपर्यंत असूं द्या. पुष्करिणि, प्रेमाचें बळ असल्यावर दुसरा आश्रय कशास पाहिजे ?

संसारांत कशींही संकटें आलीं तरी तुह्मांला भीति नाहीं. मात्र शुद्ध आचरण ठेवा. नाहीं तर माझ्यासारखी गत व्हायची ! हं, डोळे पुसा, आणि मला आनंदानें निरोप द्या. कंदनमहाराज, ही आलेंच ! ( प्राण सोडिते. )

( तडाग व पुष्करिणी शोक करितात. पडदा पडतो. )

---

# प्रवेश ५ वा.

---

( अमात्य व नागरीक )

अमा०— नागरीकहो, याप्रमाणें कंदनमहाराजांनीं राज्यतृष्णेनें प्रेरित होऊन आपल्या प्रजावत्सल महाराजांचा निर्दयपणें अरण्यांत वध करून ते हल्लीं मंदारमहाराजांसह इकडेच येण्यास निघाले आहेत. ही गोष्ट ज्या हेराकडून मला कळली त्यासच त्यांच्या आगमनाचीही आगाऊ सूचना देण्याकरितां पाठविलें आहे. ते आतां केव्हां येतील याचा कांहीं नेम नाहीं. बोला तर लवकर तुमचा काय निश्चय झाला तो. गादीचा वारस ह्मणून

तुह्मी त्यांचें स्वागत करणार कीं स्वामिद्रोही ह्मणून त्यांचा सूड घेणार ? ( नागरीक ' सूड, सूड ' ह्मणून ओरडतात. )

हेर ( प्रवेश करून ) — महाराज, त्यांच्या स्वाऱ्या वेशीपाशीं येऊन दाखल झाल्या आहेत.

अमा०— नागरीकहो, तयारीनें असा. मी पुढें होऊन त्यांचा समाचार घेतों. प्रसंग पाहून तुह्मी मला मदत करालच.

( मंदार, नंदन, इंदिरा, विहंग, व चंडी प्रवेश करितात. )

नंद०— का अमात्य, आमचें अभिनंदन करायचें तें सोडून अशा साशंक मुद्रेनें पहात कां उभे आहांत ? आणि हे नागरिक येथें लढण्याच्या तयारीनें काय ह्मणून ?

अमा०— कंदनमहाराज, आपण स्वतःच्या मृत्यूचें खोटें वर्तमान उठवून शेवटीं आपल्या बंधूचा घात केलात, आणि आतां सिंहासन काबीज करण्याला येथें आलांत ! मीं आपलें स्वागत कसें करूं ?.

( चाल—नहीं आगाह जो मुझसे )

वधोनीया महीनाथा । हराया श्री कसे येतां ॥
तरणि पावे जरी अस्ता । तरी संध्या नसे लुप्ता ॥ध्रु०॥

विजेचा चंद्र ये गगनीं । धरुनि भानुप्रभा वदनीं ।
तरी संध्या समर करुनी । क्षणीं हो त्यासवें शांता ॥ १ ॥

—आपणांला प्रतिबंध करून गादीचें रक्षण करण्याचा माझा धर्म आहे. जरी गादीचे वारस आपणच असलांत तरी तिला बंधु-वधानें विटाळलेलें शरीर मी कधीं लागूं देणार नाहीं, ही खात्री असूं द्या. एक पाऊल सुद्धां पुढें सरकलांत तर आपणांला त्याचा पश्चात्ताप होईल.

नंद०— अमात्य, आपली स्वामिनिष्ठा पाहून मनाला फार आल्हाद होतो आहे. पण आपण मला अजून ओळखिलें नाहीं. मी कंदन नव्हे. तो बिचारा स्वर्गीं निघून गेला. मी तुमचा प्रभु नंदन. अजूनही संशयच ?

अमा०— अस्सें अस्सें ! नंदनमहाराजांचेंच सोंग घेऊन आपण आलांत तर ? वहावा ! केवढें पण हें खुबीचें कारस्थान ! कंदनमहाराज, नंदनमहाराजांची गादी निर्वेधपणें चालावी ह्मणून आपण आपल्या नांवाचाही त्याग केलातना ? केवढा तरी हा स्वार्थत्याग ! देवा, तुला डोळे आहेतच !

नंद०— अमात्य, असें वेड्यासारखें काय करितां ? अहो, आ-पल्यासारखे धोरणी आणि माझ्या सहवासांत कित्येक वर्षे घाल-

विलेले मुत्सद्दी जर असे चकूं लागले तर इतरांचें कसें व्हावें ? माझ्या बोलण्यावर आपला भरंवसा नसेल तर मंदारमहाराजांना विचारा.

मंदा०— अमात्य, हा नंदनच आहे. अगदीं संशय बाळगूं नका.

अमा०— मग नंदनमहाराज मृत झालेले प्रत्यक्ष पाहिल्याचें माझ्या अत्यंत विश्वासुक सेवकानें सांगितलें तें मीं खोटेंच समजूं ?

मंदा०— मृत झाला तो कंदन, नंदन नव्हे. त्या महात्म्यानें भावाकरितां आपल्या प्राणांचा बळी दिला, आणि प्राणांपेक्षांही प्रिय अशा आपल्या वधूचा त्याग केला. मरणापूर्वी त्यानें जें पत्र लिहून ठेविलें होतें त्यांत इंदिरेशीं विवाह करण्याबद्दल त्यानें भावाला शपथही घालून ठेविली. हें पहा तें पत्र ( पत्र देतो. )

अमा०— ( नागरीकांकडे पाहून ) पौरजनहो, हेच आपले नंदनमहाराज ! यांच्या चरणरजांचें वंदन करून पुढील उत्सवाच्या तयारीला लागा. ( नागरीक नंदनास मुजरे करून निघून जातात.) नंदनमहाराज, मग मी आपला विनाकारणच संशय घेतला ! या दासाला क्षमा असावी. लहान अर्भकाला आपल्या मातेचें तोंडही पहिल्यापहिल्यानें ओळखूं येत नाहीं. पण त्याच्या अज्ञानाबद्दल ती त्याजकडे कधींही पाठ करीत नाहीं;उलट पोटाशीं धरिते.

नंद०— ( अमात्यास आलिंगून ) आपण मला ओळखिलें नाहीं; पण मला मात्र आपल्या प्रत्येक शब्दांत माझ्या एकनिष्ठ सेवकाची ओळख पटत होती.

अमा०— ( डोळ्यांस पदर लावून ) महाराज, मजप्रमाणें राणीसाहेबांच्याही कानांवर आपल्या मृत्यूची बातमी जाऊन त्यांनीं जीव दिला हें दुःखकारक वर्तमान कळविण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे.

मंदा०— हें वर्तमान आह्मांला राज्यांत पाय ठेवितांच कळलें.

नंद०— तिच्या आत्म्याला देव शांति देवो !

अमा०— आपण ज्या कामाकरितां येथून गेलां होतां तेंही पार पडल्यासारखें दिसतें. मंदारमहाराजांनीं आपल्या राज्यांत राहून आपला पाहुणचार घेण्याचें कबूल केलें ही त्यांची मोठी कृपा झाली.

नंद०— या प्रकारांत सगळाच येथून तेथून चमत्कार आहे ! मंदारमहाराजांना त्यांचें राज्यही अकल्पित रीतीनें मिळालें.

अमा०— ह्मणजे ? हा सारा ऐंद्रजालिक खेळ दिसतो.

नंद०—इंद्रजालाचा खेळ खराच ! पण आपण ज्याला भिल्लांचा राजा इंद्रजाल समजत होतों तो दुसरा कोणी नसून आपला कंदनच होता; आणि त्याच्या आज्ञेवरून त्याचा कारभारी इंदीवर आह्मांस भेटून त्यानें राज्याचीं सूत्रें पुन्हां मंदारमहाराजांच्या हवालीं केलीं.

अमा०— साराच अद्भुत चमत्कार ! महाराज, हा बोलण्याचा प्रसंग नव्हे. पण या गादीबद्दलची काळजी वदावितें याबद्दल क्षमा करा. राणीसाहेबांनीं केलेला आत्मवध पाहून आणि आपणांबद्दलची दुष्ट वार्ता ऐकून आपला वंश निर्मूल झाला असें वाटत होतें. आपणांस प्रत्यक्ष पाहून तो भ्रम नाहींसा झाला. त्याबरोबरच आपल्या कुळाचा विस्तार पहाण्याची इच्छा झाली आहे. मोहिनीराणीसाहेबांच्या मृत्यूवरून ईश्वराची सुद्धां तशीच इच्छा आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

मंदा०— अमात्य, त्याची तुह्मी काळजी करूं नका. मलांही तुमच्यासारखी भीति होतीच; पण आतां मोहिनीच्या मृत्यूमुळें नंदन व इंदिरा यांच्या विवाहाला कोणतीच आडकाठी राहिली नाहीं. इतकेंच नाहीं, तर कंदनानें आपल्या अंतकाळीं प्रदर्शित केलेली इच्छा पूर्ण करणें हें त्याच्या बंधूचें आद्य कर्तव्य आहे.

तेव्हां मीं जर माझ्या बाळेचा हात याप्रमाणें नंदनाच्या हातांत दिला ( नंदनाच्या हातीं इंदिरेचा हात देतो.) तर माझ्या कृत्याचा अव्हेर न करितां दोघें मिळून माझें वचन पुरें करितील यांत मला तिळप्राय संशय वाटत नाहीं.

नंद०— माझ्या वंशवृक्षाच्या वाढीला मूर्तिमंत अमृतवृष्टि, माझ्या आत्म्याच्या उन्नतीला सोपानपरंपरा, माझ्या सुखाची निवासभूमि, माझ्या गृहाची केवळ लक्ष्मी, अशा या इंदिरेचा मी आदरानें अंगीकार करितों. ज्या प्रेमाचा मी सतृष्ण अंतःकरणानें शोध करीत होतों त्याचा सगळा सांठा आज माझ्या हातांत आला

इंदि०—

( भैरवी—त्रिवट )

लवालि तनु उपकारें पितया ॥ ध्रु० ॥ जन्म दिला मज सफलहि केला । नृपकरिं आजी देउनिया ॥ १ ॥ अन्य जन्म घेउनिया वाटे । फेडावें ऋण-भारा या ॥ २ ॥

बाबा, या उपकाराचें ओझें मी नेहमीं शिरावर वहात राहीन.

मदा०—बाळे, माझे उपकार न मानितां त्या अचिंत्यगति देवाचे आणि त्या थोर हृदयाच्या नंदनाचे मान. त्यांनीं जर

आपला महिमा प्रकट केला नसता तर मीं मोहिनीसंबंधानें जी चूक केली होती तिचीच पुनरावृत्ति तुझ्यासंबधानें केली असती. बाळांनो, आणखी कांहीं तुमचें प्रिय होण्यासारखें आहे काय?

नंद०— दुसरें काय असणार? येवढीच इच्छा आहे कीं या जगांत विषम संबंध कधींही घडून न येवोत.

( वारांगना प्रवेश करून खालील पद ह्मणत नृत्य कारितात. )

( चाल—विलासयुता नाचुंगाउं येथें )

नसोत कुठें विषम योग लोकीं। करिती बहु
अनर्थ ते कीं॥ ध्रु० ॥ रूपवती अंधजनीं भू दुर्नृ-
पाळीं। कापुरुषीं सत्ता कठोरीं । सुकाव्य नंरिसीं
वा मना रुचे न । सुयश कुजनिं कुयश सुजनिं ।
जरठीं तरुणी स्त्री । कृपणीं श्री । अधनीं ह्री
मणि पंकीं ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

अंक पांचवा समाप्त.

---

## ईशस्तुति.

( चाल—नतकरुणावरुणालया० )

मनुजनटां नटवीसि हे अजा । रसिक तुझ्याविण न दुजा ॥ ध्रु० ॥ भुवनरंगीं व्यंग्यें जीं घडत तीं । विसरुनिया माति दे सुकृता करावया । ही विनंति करितें अंतिं ॥ १ ॥

